


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष १० : ४ : दिवाळी १९९२

दिन दिन दिवाळी
गाई म्हशी ओवाळी
गाई म्हशी कुणाच्या
लक्षुमणाच्या
लक्षुमण कुणाचा
आईबापाचा



## लोकशिक्षण विशेषांक

## अनुक्रमणिका



---

- **प्रकाशन :** त्रैमासिक (नोव्हेंबर, डिसेंबर, जानेवारी, फेब्रुवारी)
- **संपादन समिती :** कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा.
- **संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७ (दूरध्वनी : ३३६०६१/२४)
- **व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** मृणालिनी शहा, १/ शीतल अपार्टमेंट्स, ४६/४ एरंडवणे, पुणे ४११ ००४ (दूरध्वनी : ३३३८६९)
- **पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पाहा.
- **सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.

---

● **संपादक :** कल्याण काळे

● **प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा

● **लोकशिक्षण विशेषांकाचे संपादन - संयोजन :** आशा मुंडले

● **मुखपृष्ठ :** शाम देशपांडे

● **निर्मिती :** स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे - ४११ ००८.
दूरभाष : ३३४४४८ / ३३८६६६

---

# लोकशिक्षणाचे माध्यम

'भाषा आणि जीवन' च्या संपादकीय मंडळाने एक धोरणात्मक निर्णय घेतला की अधूनमधून एखाद्या विषयाला केंद्रस्थानी ठेवून त्याभोवती गुंफलेले विशेषांक वाचकाना द्यावे. त्याप्रमाणे निघालेला अनुवाद अंक आपण वाचला आहेच.

यावेळचा दिवाळी अंक 'लोकशिक्षण' या विषयाभोवती गुंफला आहे. लेखकांचा प्रतिसाद उत्तम मिळाल्यामुळे आणि त्याचवेळी पानांची संख्या आणि उपलब्ध द्रव्य यांचा ताळमेळ ठेवण्याच्या जबाबदारीमुळे आता याच विषयावर दोन अंक काढायचे ठरले. त्यापैकी हा पहिला अंक आपल्या हाती देताना विशेष संपादक म्हणून मला फार आनंद वाटतो.

लोकशिक्षण म्हटले की चटकन डोळ्यासमोर येतात ती आधुनिक प्रसारमाध्यमे- वृत्तपत्रे, नियतकालिके, बोलपट, आकाशवाणी आणि दूरदर्शन. त्यापैकी 'नभोवाणी' मधल्या एका प्रत्यक्ष उपक्रमाचा आढावा व्यंकटेश माडगूळकरांनी घेतला आहे. तो कार्यक्रम त्यांच्याच प्रतिभेची निर्मिती होती. बुद्ध आणि येशू यांच्यावर प्रा. धडफळे आणि फादर दिब्रिटो लिहीत आहेत.

एकूणच शिक्षणाचा अर्थ नेमका काय हे प्रा.लीला पाटील यांनी स्पष्ट केले आहे. लैंगिक शिक्षणाबद्दल लिहीत आहेत शांता साठे, अनंत साठे आणि अशोक केळकर आणि मराठी माणसाला लहानपणी नक्की कानावर पडणारे लोकशिक्षक रामदास यांच्याबद्दल लिहीत आहेत डॉ. मु. श्री. कानडे.

खरं म्हणजे ही केवळ झलक आहे. कारण जुन्या काळी मौखिक लोकशिक्षणाची परंपरा आपल्याकडे रुजलेली होती. अगदी गावात दवंडी देण्यापासून ते कीर्तन, प्रवचन, शाहिरी पोवाडे अशी अनेक माध्यमं होती त्या सर्वांचा विचार व्हायला हवा. त्याचप्रमाणे जाहिराती हे सुद्धा आधुनिक छापील माध्यमातून आणि दृश्यश्राव्य माध्यमातून अपरिहार्यपणे लोकांच्या मनावर परिणाम करण्याचे प्रभावी साधन आहे.

पण जागेअभावी यांचा परामर्श पुढील अंकात घेतला जाईल.

लोकांचे शिक्षण का करायचे, हा प्रश्न मात्र मला तरी पडत नाही. ज्ञात मानवी इतिहासात सर्वत्र अनेक प्रयत्न आढळतात. कारण आपल्या पिढीजवळचे





अनुक्रमणिका

संचित पुढील पिढीला द्यावे ही मानवी संस्कृतीची आदिम प्रेरणा आहे.

लोकांच्या एकूण ज्ञानाची, अभिरुचीची पातळी जितकी प्रगत तितकाच तो देश प्रगत असे निश्चितपणे म्हणता येईल. लोकांच्या शिक्षणाची जी व्यावहारिक बाजू आहे ती म्हणजे अमुक कामासाठी तमुक व्यक्ती उपयोगी पडेल असे कौशल्य तिला देणे. यासाठी शाळा, महाविद्यालये वगैरे असतात. पूर्वीसुद्धा गुरूकडे उमेदवारी असे. दुर्दैवाने या औपचारिक प्रणालींचा आज पुरा बोजवारा उडालेला आहे. औपचारिक शिक्षणावर शासनाचे पूर्वनियंत्रण आहे. अनौपचारिक शिक्षणातही शासन डोकावतेच.

पण अनौपचारिक रीतीने लोकशिक्षणात गुंतलेली अनेक मंडळी चांगले काम करताना दिसतात. लहान मुलांसाठी कोल्हापूरला लीला पाटील चालवत असलेली सृजन आनंद शाळा ही त्यातलीच एक. आशय क्लब पुण्यामध्ये सिनेमाबद्दल जाण वाढवण्याचा प्रयत्न करतो तोही अशापैकीच एक. महाराष्ट्रापुरते बोलायचे तर वृत्तसृष्टीची सुरुवातच बाळशास्त्री जांभेकर यांच्या 'लोकशिक्षणा'ने झाली.

अगदी अलीकडे पर्यंत **किर्लोस्कर, स्त्री** या मासिकांना अनेक मराठी कुटुंबांच्या तीन पिढ्यांमध्ये ''जिव्हाळ्याचा मार्गदर्शक'' मानले जात होते. त्यापूर्वीच्या काळात **सुधारक** होता.

कदाचित औपचारिक शिक्षणाचे प्रदूषण थांबवण्याकरता प्रभावी लोकशिक्षणाचा रेटा उपयोगी पडेल असे वाटते.

लोकशिक्षण का करायचे हा प्रश्न जरी नसला तरी ते नेमके कसे होते आणि त्याच्या प्रभावीपणाचे निकष कोणते हे मात्र विचार करण्याजोगे प्रश्न आहेत. तसेच किती शिक्षण लोकांपर्यंत खरोखर पोचते हेही तपासले पाहिजे. त्या बाबतीत लोकांकडून समाजाच्या अपेक्षा कोणत्या, हेही पाहिले पाहिजे.

शिवाय समाजाच्या राजकीय आणि आर्थिक नियमनाचा ढाचाही याबाबतीत काही निर्बंध घालतो. लिहिणे, वाचणे म्हणजे शिक्षण ही फार ढोबळ समजूत झाली. पण नीट विचार केला तर लक्षात येतं की प्रत्येक मानवी समाजात काही ना काही पद्धतीने आपल्या सदस्यांचे शिक्षण होतच असते. स्थूल मानाने त्याचे तीन भाग पडतात. औपचारिक शिक्षण, अनौपचारिक आणि सहजशिक्षण. यापैकी सहजशिक्षण हे अंतःप्रेरणांशी निगडित आहे आणि ते मनुष्येतर प्राण्यातही दिसते. उरलेले दोन प्रकार मात्र खास 'मानवी' आहेत. वंशसातत्य आणि संस्कृतिसातत्य या दोन्हीसाठी माणसे स्वतःवर काही नियम घालून घेतात. अर्थात ज्याप्रमाणे एखादा वंश नष्ट होतो त्याचप्रमाणे संस्कृतीमध्येही काही नाश होऊन

काही नवे निर्माण होत असते. इतकेच नव्हे तर मुद्दाम बदल घडवून आणण्याची धडपड हे प्रगत समाजाचे एक व्यवच्छेदक लक्षण आहे.

लोकशिक्षण हा अनौपचारिक शिक्षणाचाच एक महत्त्वाचा पैलू. आपण ज्या समाजात राहतो त्याची गुणवत्ता वाढावी म्हणून त्यातील घटक व्यक्तींना ''शहाणे करूनि सोडावे'' ही प्रवृत्ती मानवी इतिहासात सर्वत्र आढळते. सॉक्रेटिस, कन्फ्यूशियस, ताओ, बुद्ध, येशू यांजपासून ते अगदी फुले, आंबेडकरांपर्यंत. एवढा आवाका असलेला विषम आमच्या हाती असलेल्या पानात मांडणे अवघडच.

पण जुना आणि नवा काळ वाचकांच्या डोळ्यापुढे एकदम रहावा या दृष्टीने या भागाची मांडणी केली आहे आणि पुढच्या भागातही दोन्ही काळांकडे दृष्टी असेल.

लोकशिक्षण ही समाजबदलाचीच प्रक्रिया आहे. कारण संचित जसेच्या तसे देणे अशक्य आहे. देणारे आणि घेणारे यांच्या साद-प्रतिसादातून स्वतंत्र निर्मिती होत राहते आणि संस्कृतीचे स्वरूप बदलते.

हा बदल फक्त कपडे, खाद्यपदार्थ, दळणवळणाची साधने अशा बाह्य गोष्टींचा नसतो; तर राजेशाहीकडून लोकशाहीकडे असा वैचारिकही असतो.

आज आपल्याकडे परिस्थिती थोडी धूसर आहे. समाजाचे शास्ते चाचपडताना दिसतात. शिवाय जागतिक ताणतणावांचे दडपण इथल्या शैक्षणिक धोरणावर येणे अपरिहार्य आहे.

त्यामुळे आम्हाला खरोखर काय हवे आहे, आमच्याजवळ पूर्वीचे काय आहे, बाहेरून काय शिकण्यासारखे आहे, काय टाकून द्यायचे याचा विचार फक्त धुरीणांवर न सोपवता आपण सर्वांनी यथामति, यथाशक्ति केला पाहिजे.

इलेक्ट्रॉनिक माध्यमांच्या प्रगतीमुळे आम्ही म्हणजे साधा माणूस पूर्णपणे नियंत्रित किंवा पॅसिव्ह होण्याचा धोका अगदी उंबरठ्यावर आहे. तेव्हा आपण 'ब्रेव्ह न्यू वर्ल्ड' मधे राहायला जाऊ नये यासाठी अगदी झडझडून जागे होऊन लोकशिक्षणाकडे गंभीरपणे पाहिले पाहिजे.

**आशा मुंडले**



# बुद्ध : एक लोकशिक्षक

मो.गो.घडफळे

## ताटी उघडा ज्ञानेश्वरा

लोकहित डोळ्यासमोर ठेवून जाणत्यांनी नेणत्यांना शिकवून शहाणं करणं म्हणजे लोकशिक्षण अशी एक सोपी-सुटसुटीत व्याख्या स्वीकारली तर गौतम बुद्धानं मोठ्या प्रभावशाली पद्धतीनं, निरनिराळ्या रीतीनं, निरनिराळ्या अंगांनी, 'अनेकविध' लोकांचे शिक्षण साधलं असं दिसून येईल. लोक ही एक सामूहिक संज्ञा आहे. 'अनेकविध'त्व हे त्यात मुळातच अभिप्रेत आहे. गौतमाचा धर्म हा 'बहुजनहिताय, बहुजनसुखाय, अत्थाय, हिताय, सुखाय देवमनुस्सानं' (बहुजनांच्या हितासाठी, बहुजनांच्या सुखासाठी, देव व माणसांच्या अर्थासाठी म्हणजे उपयोगासाठी, हितासाठी व सुखासाठी) असा होता.[१] या वचनातील माणसांबरोबर असलेला 'देवां'चा निर्देश भाबडेपणाचा नसून फार महत्त्वाचा आहे हे पुढं पाहू. 'लोक' या अर्थानं पालीमध्ये 'जन', 'जनता', 'लोक', 'पजा' (प्रजा-जन्माला आलेले) व 'सत्त' (सत्त्व- प्राणिमात्र) असे शब्द येतात.[२] शिक्षकासाठी प्रामुख्याने 'सत्था' (शास्ता) हा शब्द येतो. बुद्ध हा 'सत्था देवमनुस्सानं' (देव व माणसांचा शिक्षक) होता.[३] बौद्धधर्म म्हणजे प्रबुद्धाचा, जाणत्याचा धर्म. 'धर्म' म्हणजे 'रिलिजन' नव्हे तर 'इझम्'. बौद्धधर्म म्हणजे 'बौद्धवाद' थोडक्यात बुद्धाचं 'म्हणणं वा प्रतिपादन.' 'किमक्खायी, किंवादी समणो गोतमो ('श्रमण गौतमाचे आख्यान म्हणजे कथन, काय आहे? वाद म्हणजे म्हणणं काय आहे?') असा प्रश्न विचारला जाई.[४] पालिभाषेतील 'तिपिटक' (त्रि-पिटक, तीन पेटारे, उक्तिकरंडक) बुद्धाच्या प्रतिपादनांचे संग्रह आहेत. 'रिलिजन' म्हटल्यावर पाप-पुण्य, स्वर्ग-नरक, चांगलं-वाईट जन्म व त्यांपासून मुक्ती येवढंच मनात येते; पण गौतमाने तेवढंच सांगितलं नाही. सामाजिक, राजकीय, नैतिक, प्रसंगी भाषाशास्त्रीय व साहित्यशास्त्रासंबंधीही विचार त्यानं प्रकट केले आहेत आणि ते जन-प्रबोधनाच्या दृष्टीनं फार महत्त्वाचे आहेत. ब्राह्मणी यज्ञांची निष्फलता, त्यातील पशुहत्येतील निष्करुणता, वृक्षादी राष्ट्रीय मालमत्तेचा नाश, चातुर्वर्ण्यातील विषमता, ब्राह्मणश्रेष्ठतेच्या दाव्यातला पोकळपणा, मांसाहार, स्त्रियांचं समाजातलं स्थान अशा एक ना अनेक महत्त्वाच्या सामाजिक विषयांवरचे बुद्धाचे विचार आजमितीसही लोक-बोधकच ठरतील. उग्गह मेण्डकनत्त्याच्या मुलींना त्याने गृहिणींच्या कर्तव्यांचा उपदेश केला आहे आणि अनेक ठिकाणी वृद्ध आई-वडिलांविषयीच्या कर्तव्याविषयी





अनुक्रमणिका

तो बोलला आहे. 'जोवर एकात्मतेने, सामूहिक नेतृत्व ठेवून वज्जी वागतील तोवर त्यांचा राजकीय उत्कर्षच होईल' असे राजकीय संदर्भातले विचार त्याने मांडले आहेत आणि शाक्य व कोलित यांच्यात 'रोहिणी' नदीच्या पाणी-वाटपावरून युद्ध माजलं तेव्हा त्यानं आंतरराज्यीय तणाव दूर करण्याचा उपदेशही केला आहे.[५] 'प्रतीत्यसमुत्पाद' व 'निर्वाण' सांगणारा बुद्ध 'सब्बञ्ञू'(सर्वज्ञ) तर होताच; पण तो 'लोकविदू'[६] (लोकविद्) ही होता. ''सर्व धर्म (म्ह.सर्व तात्त्विक विचार) त्यांच्या सर्व 'आकारां'सह (म्हणजे आस्पेक्ट्स् किंवा पैलू) बुद्ध भगवंताच्या ज्ञानरूपी मुखात राहतात'' अशी बौद्धांची धारणा आहे.[७] ज्ञानरूपी मुख ही कल्पना फार मोहक आहे. श्रीकृष्णाच्या मुखात यशोदेला विश्व दिसणं[८] याचा हाच अर्थ असला पाहिजे गीतेतील विश्वरूप दर्शना' चा आशयही हाच असायला हवा; पण हे ज्ञानरूपी मुख बुद्धानं उघडलं नसतं तर? जगाची केवढी मोठी हानी झाली असती ! झालं असं.

बोधगयेला पिंपळाच्या झाडाखाली ध्यानस्थ बसलेला गौतम शाक्य हा 'बुद्ध' झाला पण त्याला झालेलं ज्ञान त्याच्याच शब्दात सांगायचं तर 'गम्भीर (खोल), दुर्दर्श, दुरनुबोध (कळायला कठीण), प्रणीत (फार पोचलेलं), अतर्कावचर (सामान्य तर्कबुद्धीच्याही पलिकडलं) निपुण (सूक्ष्म), पण्डितवेदनीय (प्रज्ञावंतांनाच कळावं असं होतं) आणि 'पजा' (प्रजा) तर 'आलयरता' (चैनीत मशगूल होणं आवडणारी) होती. ''मी इतरांना शिकवायचं आणि त्यांना ते कळायचं नाही. म्हणजे व्यर्थ शीण (किलमथ-क्लेमथ) आणि त्रासदायक वैफल्य (विहिंसा-विहेसा) नको ते शिकवणं! कष्टानं मिळवलेलं ज्ञान लोकांसमोर प्रकट करणंच नको!'' (किच्छेन मे अधिगतं हलं दानि पकासितुं)[९] लोकांचं अफाट अज्ञान, ज्ञानासाठी झटण्याविषयीची अनास्था ह्या वास्तवाच्या हबक्यानं लोकशिक्षकाला पछाडणारी घोर निराशा, वरील उक्तीत फार उत्कट रीतीनं व्यक्त झाली आहे. ब्राह्मणांचा देव ब्रह्मा सहम्पति (सभापति ब्रह्मा) चरकला. ''नस्सति बत भो लोको, विनस्सति बत भो लोको यत्र हि नाम भो तथागतस्स अप्पोस्सुक्कताय चित्तं नमति, नो धम्मदेसनाय''[१०] (लोकांचा नाश- विनाश होईल जर तथागतांचं मन औदासीन्याकडे(अल्पोत्सुक्य) झुकेल, धर्मोपदेशाकडे वळणार नाही'') जाणत्यांनी नेणत्यांना शिकवलंच पाहिजे. जाणकारांनी औदासीन्य झटकलंच पाहिजे. लोकशिक्षणाला प्रवृत्त व्हायलाच हवं! ''तुम्ही शिकवा लोक शिकतील'', साक्षात् ब्रह्मदेवच बोलला. ''देसस्सु भगवा धम्मं, अञ्ञातारो भविस्सन्ति'' बुद्ध ज्ञानदेवानं ताटी उघडली. ब्रह्म्याची 'अभियाचना म्हणजे एकापरीनं अपूर्ण ब्राह्मणी धर्माला पूर्णत्वासाठी बुद्धाच्या सुधारक अवताराची वाटलेली ऐतिहासिक गरज. इतरत्रही म्हटलं आहे 'उल्लुम्पतु ब्राह्मणिं पजं'[११] (ब्राह्मणी प्रजेचा- जनतेचा 'उल्लोप' म्हणजे उद्धार कर.) आणि ब्रह्म्याची अध्येषणा





अनुक्रमणिका

(अज्झेसनं) आणि प्राणिमात्रांविषयीची करुणता (सत्तेसु च कारुञ्ञतं) यामुळं बुद्धानं 'लोक' पाहिले (लोकं वोलोकेसि). अन् काय दिसलं त्याला?

### एका तळ्यात होती

बुद्धानं पाहिलं, काहींच्या डोळ्यात धूळ (रजस् - लाली, आसक्ती, रजोगुण) खूपच झाली होती, तर काहींची लाली उतरली होती, काहींची इन्द्रिये तीक्ष्ण तर काहींची मृदू, काही चांगले तर काही वाईट, काहींना शिकवणं सोपं तर काहींना अवघड, काहींच्या मनात परलोक-पाप याविषयी भय(पापभीरू) तर काही धश्चोट, जणू एखादं तळं असावे[१२] निळ्या, तांबड्या, अन् पांढऱ्या कमळांचं. त्यांत काही कमळं पाण्यात उगवलेली, पण पाण्यातून बाहेर न आलेली, काही (कशीबशी) पाण्याच्या पातळीबरोबर असलेली तर(काहीच) पाण्यावर मान काढून उभी असलेली. एक सुरेख काव्यमय आणि तितकीच बोधक उपमा. "All the world's a stage! And all the men and women merely players" शेक्स्पिअरच्या या रंगभूमी व पात्रं यांच्या चित्राइतकंच (ॲज यू लाइक इट २:७) बुद्धाचं पुष्करणी व कमळ यांचं चित्र बोलकं आहे.

### अधिकार तैसा करू उपदेश

एकाच तळ्यातली कमळं वेगवेगळ्या विकासावस्थेत असतात म्हटल्यावर त्यांना त्यांच्या 'इयत्ते' प्रमाणे शिकवलं पाहिजे हे ओघानं आलंच. 'इन्द्रियवेमत्तता'[१३] हा बुद्धाचा या बाबतीतला निकष शास्त्रपूतच आहे. इन्द्र ही बलाची देवता. इन्द्रिय म्हणजे सबळपणा. हस्तपादादिक पांच कर्मेन्द्रियं, चक्षुरादी पाच ज्ञानेंद्रियं, व आतलं इंद्रिय मन येवढीच इन्द्रियं बुद्धानं मानलेली नाहीत. ज्ञानाची समर्थ साधनं या व्यापक अर्थानं इन्द्रिय हा शब्द पातंजलयोगाप्रमाणे श्रद्धा (भावनेची दृढता),वीर्य (मनःसामर्थ्य), स्मृती (जागरूकता), समाधी (एकाग्रता), आणि प्रज्ञा (आकलनशक्ती) यांना उद्देशून तो वापरतो. विविध (वि) प्रमाणात (मात्रा) ह्या इंद्रियशक्ती असणं म्हणजे 'इन्द्रियवैमात्र्य' (किंवा पालीमध्ये 'इन्द्रियवेमत्तता'). सर्व लोकांची शक्ती सारखी नसते. म्हणून तर 'लोक' या सामूहिक घटकातील प्रत्येक व्यक्तीसाठी बुद्ध एक समर्पक शब्द वापरतो. 'पुथुज्जन'[१४] (पृथक्-जन). 'जन', जन म्हणून समान असले तरी एकमेकांपासून इंद्रियसामर्थ्या- नुसार भिन्नभिन्नही असतात. प्रत्येकाचे कल (अधिमुत्ति) हे सुद्धा भिन्न असतात. व्यक्तींचे कल (अधिमुत्ति) व त्यांच्या सर्वतोपरी ग्रहणधारणादिकांच्या शक्ती (इन्द्रियवेमत्तता) हे ध्यानात घेऊन त्यांचे त्यानुसार

विविध गट कल्पून त्यांना शिकवलं पाहिजे. अशा प्रकारच्या व्यक्तींच्या गटवार विभाजनांनुसार त्यांचं वर्णन पुग्गलपञ्ञत्ति (पुद्गलप्रज्ञप्ति) या अभिधम्म (अभिधर्म) पिटकातील ग्रंथात केलेलं आहे.

**शिक्षणातील शाखा व टप्पेवारी**

मूळ बौद्धधर्मात 'अर्हत्त्व' हे परम ध्येय होतं. त्या पलिकडे शिक्षण नव्हतं. बुद्धशासन (म्हणजे बुद्धाची शिकवण) ही तीन विभागात विभागली गेली होती व या सर्व विभागांना शिक्षा (शिक्षण, पालि- सिक्खा) हाच शब्द होता. या तीन शाखांनुसारच शान्तिदेवाचा शिक्षा- समुच्चय' व बुद्धघोषाचा 'विसुद्धिमग्ग' (विशुद्धिमार्ग) हे ग्रंथ लिहिले गेले आहेत. अधिशीलशिक्षा, अधिचित्तशिक्षा, व अधिप्रज्ञाशिक्षा अशा त्या तीन विद्याशाखा आहेत व त्यांत योग (इन्टेग्रेशन) अभिप्रेत आहे. शील म्हणजे नीति व आचार (एथिक्स) हा पाया; समाधि म्हणजे चित्तभावना (सायकॉलॉजी) हा मध्य व प्रज्ञा म्हणजे (बुद्धिविकास) ही परमावधी होय. गौतमाला हे तीन क्रमाक्रमानेच (अनु) प्राप्त झाले होते. 'सीलं, समाधि, पञ्ञा च विमुत्ति च अनुत्तरा। अनुबुद्धा इमे धम्मा बुद्धेनादिच्चबन्धुना''।।[१५] (आदित्यबन्धू बुद्धाला शील, समाधी व प्रज्ञा हे एकामागून एक ज्ञात झाले व त्यांच्या समग्र विकासाचं फळ म्हणजेच अनुत्तर विमुक्ती.)

हे सर्व ध्यानात ठेवून बुद्ध कोणासही क्रमाक्रमानं (आनुपुब्बि - आनुपूर्वी) शिकवत असे. 'भगवा अनुपुब्बिं कथं कथेसि....' (विनय महावग्ग पृ. १७ व इतरत्रही) चर्मकार ज्याप्रमाणे चामडं कमावतो, तसं माणसाचं मन 'कमवावं' लागतं. याला 'कम्मञ्ञ' (कर्मण्य) हाच नेमका शब्द वापरला आहे. वाराणशीच्या श्रेष्ठी गृहपतीचं (यशाच्या वडिलांचं) मन जेव्हा कल्य, मृदू, विनीवरण झालं तेव्हाच गौतमाने त्याला दुःख, समुदय, निरोध, व मार्ग यांचा उपदेश केला आणि मग 'एखादं वस्त्र स्वच्छ धुतल्यावर, त्यावरचे डाग काढल्यावर त्याला उत्कृष्टपणे रंग देता येतो' तसा शिक्षणाचा रंग त्याच्या मनावर चढवला गेला. (महावग्ग. पृ. १६) शिकविण्यासाठी, जिला शिकवायचं ती व्यक्ती शिकविण्याच्या अवस्थेत असायला हवी (वेनेय्यसत्त - वैनेयसत्व), घडविली जाईल अशी हवी (भब्ब - भव्य), तिला तिच्या कलानुसार (अधिमुत्ति), क्रमशः (आनुपुब्बि) शिकवलं पाहिजे. शिकवणं म्हणजे वेगळं काही नाही. माणसं डोळस असतातच त्यांना वस्तूंकडे पाहण्याचा एक परिदर्श (पर्स्पेक्टिव्ह) द्यायचा. अंधारात मशाल दाखविली की डोळस व्यक्तींना दिसते. उलटी पडलेली गोष्ट सुलट करून ठेवली की तिचं स्वरूप कळतं. झाकलेलं उघडं केलं की त्याचं मर्म उमगतं आणि क्वचित् दिशा चुकलेल्यांना मार्गदर्शन करावं





अनुक्रमणिका

लागतं, एवढं आणि एवढंच बुद्ध करीत असे आणि या संबंधांत हजाराहून अधिकवेळा एकच छापाचे वर्णन असलेला परिच्छेद त्रिपिटकांत येतो. ''सेय्यथाऽपि भन्ते, निक्कुज्जितं वा उक्कुज्जेय्य, पटिच्छन्नं वा विवरेय्य, मूळ्हस्स वा मग्गं आचिक्खेय्य, अन्धकारे वा तेलपज्जोतं धारेय्य - चक्खुमन्तो रूपानि दक्खवन्तीति एवमेव भगवता अनेकपरियायेन धम्मो पकासितो''[१५] (जसं काही उपडं पडलेलं सुलटं करावं, झाकलेलं उघडं करावं, भांबावलेल्याला योग्य दिशा दाखवावी, अंधारात मशाल धरावी, अशासाठी की डोळस व्यक्तींना दिसावं. याप्रमाणे भगवंतानं नाना परींनी धर्मोपदेश साधला). या उपदेशानं शिकवल्या गेलेल्या व्यक्ती कशा असतात याचंही वर्णन मार्मिक आहे. 'दिट्ठधम्मा' (वस्तुस्वभावांची दृष्टी आलेले), 'विदितधम्मा' (धर्माचे आकलन झालेले)', 'तिण्णविचिकिच्छा' (संशय फिटलेले), 'वेसारज्जप्पत्ता' (आत्मविश्वास निर्माण झालेले), 'अपरपच्चया सत्थुसासने' (शास्त्याच्या शिकवणीत अ-परप्रत्यय म्हणजे आत्मप्रत्ययी झालेले). लोकशिक्षणाचा हाच परिणाम अभिप्रेत असतो. लोकांना दृष्टी मिळावी, आत्मविश्वास निर्माण व्हावा, ज्ञानानुभवाबाबत ते परावलंबी राहू नयेत; आत्मनिर्भर व्हावेत.[१६]

**श्रद्धेविना ज्ञान कैचे**

आज आपल्याला अंधश्रद्धानिर्मूलनाबाबत जे आणि जेवढं वाटतं ते आणि तेवढं इसवी सन पूर्व ६व्या शतकांत गौतमालाही वाटत होतं. पण हेही लक्षात घ्यायला हवं की एकूणच भारतीय परंपरेत ज्ञानाची एक आवश्यक पूर्वअट (कन्डिशन) म्हणून श्रद्धा मानली गेली होती अन् ती 'अन्ध' कधीच नव्हती. ऋग्वेदात श्रद्धासूक्त[१७] आहे, उपनिषदांनी 'श्रद्धत्स्व सौम्य'[१८] हाच पुकारा केला आणि 'श्रद्धा हे श्रेष्ठ धन आहे' (सद्धीध वित्तं पुरिसस्स सेट्ठं' सुत्तनिपात.)[१९] ही गौतमाचीही धारणा होती. ''अमृताची ताटी उघड, ऐकणारे भेटतील'' अशी ब्रह्म्यानं विनवणी केल्यावर बुद्धानं त्यास प्रतिसाद दिला. 'कान असणाऱ्यांनी आपल्या श्रद्धांचे ओघ इकडे (बुद्धाकडे) वळवावेत.' (अपारुता तेसं अमतस्स द्वारा ये सोतवन्तो पमुञ्चन्तु सद्धं)[२०]

'आ', 'अनु', 'परि' या प्रमाणे संस्कृतात् 'श्रद्' हा खरा तर उपसर्ग नाही; तो शब्द आहे. ('स्' चा 'ह्' होणे ही प्रक्रिया सांगितली जाते व 'श्रद्'चंच 'हृद्' (हृदय) असं रूप होतं.) श्रद्धा म्हणजे मनोभावे हार्दिक रीतीनं काही करणं, मन ओतणं. हे कोणत्याही ज्ञानासाठी आवश्यक आहे. बुद्धानं श्रद्धा हे 'इन्द्रिय' मानलं आहे. पारंपरिक निष्ठांमध्येही सातत्यानं योग्य बदल करणं हे समाजोन्नतीसाठी आवश्यक असतं. माणसाच्या देवांवरील श्रद्धा म्हणजे त्यांच्या आदर्शाविषयींच्या

निष्ठा. त्या निष्ठा सुविहित (वेल- प्लेस्ट) करण्यासाठी देवांना सुधारून घ्यायला हवं. ब्राह्मणग्रंथ म्हणतात ''यथा वै देवानां चरणं तद्वा अनु तन्मनुष्याणाम्' (जसं देवांचं चरण म्हणजे आचरण तसंच त्यानुसार माणसांचं)[२१] यासाठीच दीघनिकायातील सक्कपञ्हसुत्त, जनवसभसुत्त या सुत्तांमधून व इतरत्रही गौतमानं इन्द्र, वैश्रवण, ब्रह्मा इत्यादी वैदिक देवतांमध्ये ठळक अशा नैतिक सुधारणा घडवून त्यांच्या सुधारित आवृत्त्या सादर केल्या. मुळांवर आघात करणाऱ्या समुन्मूलनवादी (रॅडिकल) समाजसुधारकांना अपेक्षित यश येत नाही. बुद्धानं देवांना अमर व नित्य ठेवलं नाही. पुण्यकर्मानं त्यांना देवलोकात स्थिती प्राप्त करून दिली आणि पुण्यक्षयानुसार त्यांना पुन्हा पृथ्वीवर उतरवलं. पुण्यालाही पौराणिक अर्थ न देता सकस, डोळस, समाजोन्नतिकारक नैतिक आशय दिला. अशोकाच्या शिलालेखातून हे स्पष्ट होतं. 'या इमाय कालाय जम्बुदीपसि अमिसा देवा हुसु ते दानि मिसा कटा' (आजवर जम्बुद्वीपात जे देव खरे ठरत होते ते आज खोटे ठरले.) या संदर्भात सहस्रम् व ब्रह्मगिरि येथील लेखही पाहावेत. व्हिन्सेन्ट स्मिथचा अशोक हा ग्रंथ (पृ. १४९-१५१) व देवदत्त भांडारकर यांचा इन्डियन ॲन्टिक्वेरी मधला लेख (१९१२ पृ. १७०) पाहावे.

**लोकशिक्षणाचं माध्यम लोकभाषाच**

गौतम बुद्धाचे या संदर्भातील विचार वैदिक-परंपरेच्या पार्श्वभूमीवर समजून घ्यायला हवेत. ज्या दृष्टींतून पिढ्यानपिढ्या वैदिक साहित्य पाहिलं गेलं त्या संकुचित दृष्टिकोनामुळेच की काय वेद हे अर्थसंपन्न असूनही 'अनर्थका हि मन्त्राः' (मंत्रांना अर्थवत्ता नाही) असा टोकाचा दृष्टिकोण कौत्सानं घेतल्याचं यास्काच्या निरुक्तावरून कळतं. कौत्साच्या अनेकविध आक्षेपांत एक महत्त्वाचा आक्षेप होता की वैदिक मंत्र 'नियतवाचोयुक्तयः' व 'नियतानुपूर्व्याः' आहेत.[२२] थोडक्यांत त्यांच्यातील वाक्ययोजना व क्रम हे काष्ठवत् दृढ आहेत. 'अग्निः पूर्वेभिः ऋषिभि : ....' या ऐवजी 'वह्निः प्राचीनैः मुनिभिः' म्हटलं तर चालणार नाही इतकं अर्थापेक्षा शब्दांना अधिक महत्त्व आलं होतं. अर्थ न कळताही केवळ सस्वर वेदपठनानं 'अपूर्व' (पुण्य) मिळतं अशी समजूत रूढ झाली होती. यामुळे अर्थाकडे दुर्लक्ष होऊन लोक अर्थ विसरले व बुद्ध म्हणतो त्याप्रमाणे वेदाध्ययन म्हणजे 'लपितलापन' (गुरूनं बोलायचं आणि शिष्याला तेच बोलायला लावायचं) व्हायला लागलं. बुद्धाचा धर्म 'स्वाक्खात' (सु-आख्यात म्हणजे चांगल्या प्रकारे सांगितलेला )होता. तो 'अर्थ' व त्यासाठी 'व्यञ्जन' म्हणजे शब्द वापरणारा होता (सात्थो सब्यञ्जनो). शब्दांपेक्षा अर्थाला एकूणच बौद्ध परंपरेत महत्त्व आलं आणि ते योग्यच झालं. सारिपुत्त

अस्सजीला म्हणतो.

"अप्पं वा बहुं वा भासस्सु, अत्थं येव मे ब्रूहि। अत्थेनेव मे अत्थो, किं काहसि ब्यञ्जनं बहुं"।।[२३] (कमी बोल किंवा जास्त बोल. अर्थ मला हवा आहे. केवळ पुष्कळ शब्द वापरण्यात काय हशील आहे?)

अर्थात पदं व व्यञ्जनं यांनाही महत्त्व आहेच. पण ते साधन म्हणून. त्यांच्यातूनच अर्थबोध होत असतो. आणि पदव्यञ्जनांच्या गैरमांडणीमुळे (दुन्निक्खित्त दुर्निक्षिप्त) अर्थही कळायला कठिण जातो, (दुन्नय-दुर्णय) होतो हे बुद्ध जाणत होता (दुन्निक्खित्तेहि पदब्यञ्जनेहि...अत्थो ऽ पि दुन्नयो होति। अंगुत्तरनिकाय २.१५५.)

पण काही व्यक्ती शब्दोच्चारणाच्या शुद्धीविषयी अकारण अत्याग्रही असतात. समाजातील सर्व घटकांचे उच्चार त्यांना वाटत असणाऱ्या आदर्श पद्धतीनेच व्हायला हवेत असा त्यांचा हेका असतो. बुद्धाच्या शिष्यांत अनेक मूळचे ब्राह्मणी पठडीतले होते. त्यातही 'काटेकोर' पेक्षा 'काटेतोल' रीतीने विशुद्ध उच्चार करणारे दोघे भाऊ होते. यमेळु व तेकुल. ते एकदिवशी शास्त्याकडे तक्रार घेऊन आले. "आपल्या संघात निरनिराळ्या पद्धतीची नांवं असणारे, निरनिराळ्या गोत्रातील-जातीतील- कुळांतील भिक्षू आहेत. ते आपापल्या बोलण्याच्या ढंगाने बुद्धवचनांत दोष निर्माण करीत आहेत. आपण बुद्धवाणीला वैदिक भाषेचं (छन्दस्) रूपच देऊ या ना!"[२४] गौतमाला हा प्रस्ताव अजिबातच पसंत पडला नाही. कधी नव्हे तो, बुद्ध रागावला व अतिशय रागावल्यावर त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडला. 'फालतू माणसांनो' (मोघपुरिसा). "कशालारे माणसं झालांत तुम्ही,! बुद्धवचनाला वैदिक संस्कृताचं रूप दिलं तर ज्यांचा धर्माकडे अजून ओढा नाही त्यांना ओढा वाटणार नाही आणि उलट जे ओढले गेले आहेत त्यांच्या मनात वेगळे विचार यायला लागतील. जो कोणी बुद्धवाणीला वैदिक-संस्कृताचं रूप द्यायचा प्रयत्न करील तो 'दुष्कृत(दुक्कट) हा अपराध करेल. स्वतःच्या बोलीत बुद्धवाणी आत्मसात् करावी." (विनय २. १३९.१ = चुल्लवग्ग. ५.३३) "अनुजानामि, भिक्खवे, सकाय निरुत्तिया बुद्धवचनं परियापुणितुं" आज आपल्याला उपलब्ध असलेलं हीनयानी तिपिटक पालि वा पाळि भाषेतील आहे. या भाषेला 'मागधी' असंही काही ठिकाणी संबोधलं गेलं आहे. वर्धमान महावीर (निगण्ठ नाटपुत्त) हा बुद्धाचा ज्येष्ठ समकालीन. त्यानंही लोकभाषेचाच उपयोग केला; पण ती भाषा 'अर्ध-मागधी' म्हणून ओळखली जाते. बुद्ध व महावीर एकाच समाजाला, एकाच काळी उपदेश करीत होते. दोघांची लोकभाषा फारशी भिन्न असणार नाही. आजची 'पालि' ही कदाचित् काही संस्कार करून आणि म्हणून काहीशी अ-नैसर्गिक (मूळची




अनुक्रमणिका

जशीची तशी नाही) या अर्थाने 'कृत्रिम व वाङ्मयीन भाषा' (Kunstsprache विविध बोलींचा समन्वय)[२५] ठरली आहे. तिच्यात मागधी, शौरसेनी, पैशाची या सर्वांच्याच काही काही लक्षणांचा आढळ होतो. कोणत्याही एका विशिष्ट प्राकृताची सर्व लक्षणं तिच्यात आढळत नाहीत. म्हणून तर पालीचा अन्तर्भाव् प्राकृतात न करता, स्वतंत्र रीतीनं उल्लेख करण्यात येतो. एक मात्र खरं की बुद्ध शिष्टजनांची, वैदिक परंपरेतली संस्कृत भाषा बोलत नव्हता. अंग, मगध, भद्र अशी जनपदं (प्रान्त) पाहून तो ती ती प्रान्तीय भाषा वापरत असला पाहिजे. भाषिक बाबतीत विशिष्ट बोलींचाही आग्रह धरणं त्याला मान्य नव्हतं. काही शब्द व शब्दप्रयोग एकमेकालगतच्या बोलींमधून समान असतात. त्यांचा जास्तीत जास्त वापर करून, बोलींमधल्या वैशिष्ट्यांचा आग्रह न धरता शिकवणं हा भाषिक संदर्भात त्यानं मांडलेला 'मध्यम मार्ग' होता. अरणविभङ्गसुत्ततला (मज्झिमनिकाय ३, पृष्ठ २३७ व २४३ ) त्याचा उपदेश फार समंजसपणाचा आहे. ''जनपदनिरुत्ति''नाभिनिवेसेय्य, सामञ्ञं नातिधावेय्या।'' (जनपदनिरुक्तींमधील वैशिष्ट्यांबाबत हटवादी राहू नये, सहसा समानतेच्या (सामञ्ञ- सामान्य, सर्वांस समान असणारे शब्द व प्रयोग) मर्यादा ओलांडू नयेत.) एकच पातेलं काही ठिकाणी 'पाति' तर इतरत्र 'पत्त', 'वित्थ', 'सराव', 'धारोप', 'पोण', 'पिसील' अशा कितीतरी शब्दांनी उल्लेखिलं जातं. याबाबत एक विशिष्टच शब्द वापरला गेला पाहिजे हा आग्रह चुकीचा आहे. उचटणं / उलथणं, झुणका / पिठलं, चपाती / पोळी, गडंगनेर / केळवण, बडिशेप / बडिशोप, वहाण / चप्पल, ठेचा /खरडा या विकल्पांबाबत अत्याग्रह नको. साहित्यसम्राट न. चिं. केळकर म्हणाले होते त्याप्रमाणे ''हलवाई काय न् मेवेकरी काय?, अर्थ एकच'' विविध बोलींच्या अठरापगड जाती- जमातींशी बोलतांना बुद्धाची एक खास डॉक्टरी वळणाची बहुपेडी भाषा तयार झाली होती.[२६] (''बुखार है क्या? ताप येतो कां? टेम्परेचर आहे?'', या चालीवर डॉक्टरमंडळी का बोलतात?) यामुळेच आजच्या पालीत अनेक बोलींतील शब्दांचं आणि वाक्ययोजनांचं बेमालूम मिश्रण झालं आहे. एका शब्दाऐवजी बुद्ध अनेक पर्यायी शब्द वापरतो, पर्यायी वाक्यरचना करतो. हेतू हाच की एकाला एका रीतीने कळेल तर दुसऱ्याला दुसऱ्या. (अञ्ञथा व अञ्ञो बुज्झति, अञ्ञथा व अञ्ञो, अट्ठसालिनी. डॉ. पु.वि.बापट संपादित आवृत्ती. पृ. १४८)

लोकांकडे पाहण्याचा लोकशिक्षकांचा दृष्टिकोण असा सहानुभूतीचा, जिव्हाळ्याचा अन् स्नेहाचा हवा. लोकांच्या आकलनशक्ती आपल्याला विकसित करायच्या आहेत हा भाव त्यांचेकडे हवा. लोकांसाठी ज्याप्रमाणे पालीत 'पुथुज्जन' (पृथक्-जन) असा शब्द येतो त्याचप्रमाणे 'बाला अव्यत्ता' (बालाः अव्यक्ताः) असा

शब्दप्रयोग येतो. 'बालत्व' हे वयानुसार नसून, कुवतीनुसार आहे. अपरिपक्वता ही त्यात अभिप्रेत आहे आणि 'अव्यक्त' म्हणजे ज्यांच्या आकलनशक्ती मिटलेल्या पानांप्रमाणे आहेत, त्यांचा विकास व्हायचा आहे; पोटेन्शिअल डेव्हलप करायचं आहे.

यासाठी जाणकारांनी अन्नछत्रांप्रमाणे प्रश्नसत्रं आयोजिली पाहिजेत. गौतम हे आवर्जून करायचा. पालि परिभाषेत याला 'सब्बञ्ञू- पवारणा' ('सर्वज्ञ- प्रवारणा' म्हणजे सर्वज्ञाकडून हवे ते प्रश्न विचारण्यासाठी केलं गेलेलं निमंत्रण) म्हणतात.[२७] समाजातील निरनिराळ्या स्तरातील लोक कवी, काव्य, भाषा, आवाह-विवाह, यज्ञसंस्था, चातुर्वण्यातील वैषम्य अशा एकना दोन अनेक प्रश्नांवर विचारत असत आणि 'विभज्जवादी सत्था' (विश्लेषणपूर्वक शिकवणारा) त्या सर्व प्रश्नांची सविस्तर उत्तरं देत असे. मनात 'कारुण्य' होतं. व्यक्ती पाहून क्वचित् मार्दवानं, क्वचित् कठोरतेचाही आश्रय घेऊन तर बहुतेक वेळा या दोहोंचा मिलाफ साधूनच[२८] तथागत पंचेचाळीस वर्षे लोकशिक्षणाचं कार्य करत होता; एक चालतं-बोलतं विद्यापीठच झाला होता. त्याच्या भिक्षूंनाही त्याचा उपदेश हाच होता- ''चरथ भिक्खवे चारिकं बहुजनहिताय, बहुजनसुखाय, अत्थाय, हिताय, सुखाय देवमनुस्सानं[२९] लोकशिक्षणाचे कार्य अफाट आहे. ''जिथं एकानं जाऊन चालेल तेथे दोघे जाऊ नका'' गौतम बुद्धाची लोकशिक्षणाविषयीची कळकळ माझ्या मते या उक्तीत सर्वांत समर्थपणे व्यक्त झाली आहे -''मा एकेन द्वे अगमित्थ''.[३०]



**टिपा**

१. विनयपिटक महावग्ग. पृ. २३. (नालंदा प्रत)
२. या शब्दांसाठी व लेखात आलेल्या इतरही शब्दांसाठी ऱ्हीस डेव्हिड्ज् व स्टीड यांचा पालि-इंग्रजी शब्दकोश पहावा.
३. विनय-महावग्ग. पृ. ३५
४. विनय - महावग्ग. पृ. ३९
५. ब्राह्मण-श्रेष्ठता वादातील पोकळपणा व चातुर्वर्ण्यातील विषमतेविषयी दीघनिकायातील अम्बट्ठसुत्त, वासेट्ठसुत्त व सुत्तनिपातातील अस्सलायन सुत्त पहावं. ब्राह्मणी यज्ञाविषयीच्या विचारांसाठी दीघनिकायातील कूटदन्त सुत्त पहावं. मांसाहारविषयक विचारांसाठी सुत्तनिपातातील आमगन्ध-सुत्त पहावं. उग्गह मेण्डक नत्त्याच्या उपवर मुलींना केलेल्या सांसारिक

उपदेशासाठी अंगुत्तरनिकायाच्या तिसऱ्या खंडातील (३.३६) सुत्त पहावं. वज्जींविषयी व्यक्त केलेल्या राजकीय विचारांसाठी दीघनिकायातील महापरिनिब्बानसुत्त पहावं.

६. विनय-महावग्ग पृ. ३५

७. सब्बे धम्मा सब्बाकारेण बुद्धस्स भगवतो ञाणमुखे आपाथं आगच्छन्ति।

८. विश्वविषयक गुरुमुखातून ज्ञान प्राप्त होणं म्हणजे मुखात विश्व दिसणं हा साधा आशय.

९. विनय- महावग्ग पृ. ६.

१०. विनय महावग्ग पृ. ६-९

११. पहा : हार्वर्ड जर्नल ऑव्ह एशिॲटिक स्टडीज् १९३९, खंड ४, पृ. १४६.

१२. विनय -महावग्ग पृ. ९.

१३. शब्दासाठी पहा वर उल्लेखिलेला कोश.

१४. कोशातील नोंद पहावी.

१५. विनय-महावग्ग पृ. ३७ व त्रिपिटकांत इतरत्र अनेकवार.

१६. विनय-महावग्ग पृ. १५

१७. ऋग्वेद १०. १५१

१८. छांदोग्य उपनिषद् ६.१२.२

१९. सुत्तनिपात, आळवकसुत्त गाथा २.

२०. विनय-महावग्ग पृ. १०

२१. शतपथ ब्राह्मण १.३.१.१ ३.४.१.५, देवानां वै विधामनु मनुष्या; तेथेच ६.७.४.९ व ९.१.१.१९,

२२. निरुक्त (आवृत्ती लक्ष्मण सरूप यांची, १९२७) पृ. ३७.

२३. विनय- महावग्ग पृ. ३९.

२४. विनय-चुल्लवग्ग पृ. २२८-२२९ (पहाः भाषा आणि जीवन उन्हाळा १९८७ पृ. ५१-२) .

२५. पालीचं भाषिक स्वरूप, 'सका निरुत्ति' या पदसमूहाचा अर्थ, व पालि-भाषेचं मूळरूप या महत्त्वांच्या मुद्यांसंबधीच्या चर्चेसाठी विल्हेल्म गायगर यांच्या मूळग्रंथाचं बटाकृष्ण घोष यांनी केलेलं भाषान्तरः पालि - लिटरेचर ॲंड लँग्वेज (कलकत्ता विद्यापीठ १९४३) पृ. २-७ व मॉरिझ विंटरनिट्झ यांच्या ग्रंथाचं भाषांतर : हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर (कलकत्ता विद्यापीठ) खंड. २, पृ. ५७६, परिशिष्ट २. पहावं.

२६. पालि-तिपिटकांतील पर्याय - शब्दांच्या सरींविषयी, पर्यायी वाक्यरचनांच्या

वैशिष्ट्यांसाठी सिनॉनिमिक कोलोकेशन्स इन द तिपिटक : अ. स्टडी हा माझा प्रबंध पाहावा. (पुणे :भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर, १९८०)

२७. सुत्तनिपात अट्ठकथा १. २२९

२८. ''सण्हेनं ऽपि विनेति, फरुसेन ऽपि विनेति, सण्हफरुसेनऽपि विनेति'' (अंगुत्तर निकाय ३. १९६) (स्नेह आणि पारुष्य यांचा मिलाफ येथे सूचित आहे.

२९. विनय-महावग्ग, पृ. २३

३०. तेथेच.

**फर्गसन महाविद्याला, पुणे ४११ ००४**

**गौतम सारिपुत्ताची मिस्कीलपणे फिरकी घेतो**

भगवान बुद्धांचा पडाव नालंदा इथे होता. त्या ठिकाणी पूज्य सारिपुत्त येऊन पोचले. तथागतांना वंदन करून ते जवळच आसनस्थ झाले आणि म्हणाले,'भगवन्, भगवानांच्यावर माझी परमश्रद्धा आहे. इतकी की मला वाटतं की भगवानांच्याहून संबोधीच्या बाबतीत श्रेष्ठ आणि अधिक ज्ञानी असा कुणी दुनियेत ना पूर्वी झाला ना यापुढे होणार आहे ना ह्या समयी आहे, ना कुणी फिरस्ता श्रमण ना कुणी गृहस्थ ब्राह्मण.'

'हे सारिपुत्ता, तुझ्या तोंडून तर फारच उदार आणि आर्षभ (बैलाच्या डुरकाळीगत) शब्द निघाले', भगवानांनी उत्तर दिलं. 'यावरून एक गोष्ट बरीक लक्षात येते की भूतकालीन सगळ्या तथागतांची तुला पक्की माहिती आहे. त्यांचं मनोगत तू मनोमन जाणत असणार, त्यांची वागणूक कशी होती, त्यांचं ज्ञान किती होतं, ते मुक्तीच्या कोणत्या टप्प्यापर्यंत पोचलेले होते, सगळं....' (तथागत म्हणजे पोचलेला माणूस)

'छे, तसं नाही, महाराज!'

'आणखी म्हणजे भविष्यकाळीन तथागत कोणकोण असणार, त्यांचं मनोगत काय काय असणार हे तू मनोमन जाणत असणार.'

'छे छे, तसं नाही, महाराज!'

'ते जाऊ दे, सारिपुत्ता, निदानपक्षी तू मला तरी जाणून असणार, माझ्या मनाचा वेध....'

'छे छे छे, तेवढं सुद्धा नाही, महाराज!'

'म्हणजे तर मग, सारिपुत्ता, तुला भूतभविष्य - काळातल्या कोणत्याच भगवानांची माहिती नाही म्हणतोस. पण मग कशाला बरं इतकं टोकाला जाऊन शब्दांची उधळण ?

(तिपिटक, सुत्तपिटक, दीघनिकाय ३:५:१ वरून थोड्या संक्षेपाने)

# ‘नभोवाणी शेतकरी मंडळ’

## आकाशवाणी पुणे केंद्रानं पार पाडलेली एक योजना

**व्यंकटेश माडगूळकर**

एकोणीसशे पंचावन्न नोव्हेंबर महिना चार दिवसांवर आला होता. मी मुंबई-पुणे रस्त्यावर वडील बंधूच्या पंचवटी बंगल्याशेजारच्या बंगल्यात भाडेकरू म्हणून राहत होतो. मराठी साहित्य आणि मराठी चित्रपट ह्या क्षेत्रात मी धडपडत होतो. ह्या दोन्हीही क्षेत्रात त्या काळी चरितार्थाला पुरेल एवढा पैसा मिळणं कठीणच होते. चित्रपटाच्या मिळकतीचा भरवसा नसे आणि मासिकातून प्रसिद्ध होणाऱ्या कथेला सात रुपये मोबदला मिळे. पुस्तकासाठी प्रकाशक ‘दोन रुपये पेज’ असा भाव देत. महिन्याच्या महिन्याला निश्चित अशी मिळकत हाती यावी म्हणून मी नोकरी मिळवण्याच्या पाठीमागे लागलो होतो. साहित्य, अभिनय ह्यांच्याशी संबंधित अशा क्षेत्रात नोकरी मिळवणे शक्यच नव्हतं. कारण, सोळाव्या वर्षी बेचाळीस ऑगस्टच्या चळवळीत गेल्यामुळे मी हायस्कूल मधूनच शिक्षणाला कायमचा रामराम ठोकला होता. माझ्यापाशी कोणतीही डिग्री नव्हती. आजवरचं सगळं शिक्षण रस्त्यावर झालं होतं. अशा माणसाला सरकारात नोकरी कोण देणार?

पण श्री. बाळकृष्ण केसकर, श्री. पुरुषोत्तम मंगेश लाड यांच्यासारखी शहाणी माणसे मंत्री, सचिव म्हणून आकाशवाणी खात्यात आली आणि त्यांनी क्रांती केली. आकाशवाणीच्या कार्यक्रमात चैतन्य यावं म्हणून त्यांनी आपआपल्या भाषेत ज्यांनी साहित्यात नाव कमावले आहे अशी लेखक, कवी, नाटककार, संगीततज्ञ अशी गुणी माणसं प्रोग्रॅम प्रोड्यूसर म्हणून घ्यावीत असा निर्णय घेतला आणि भराभर नेमणुका केल्या.

पुणे केंद्रावर माझी रूरल प्रोग्रॅम प्रोड्यूसर म्हणून नेमणूक झाली. पत्र हाती आले आणि पाठोपाठ एके दिवशी आकाशवाणी केंद्रातून फोन आला.

“सर, व्हेन आर यू जॉइनिंग?”

हा फोन पुणे आकाशवाणी केंद्राचे प्रमुख श्री. नंदलाल चावला ह्यांचा होता. मी केव्हा रुजू होतो आहे ह्याची ते वाट पाहत होते!

नोव्हेंबरच्या एक तारखेला मी आपल्या कामावर रुजू झालो आणि लगेचच मला मुंबईला जावे लागले. सेक्रेटरी पी. एम्. लाड ह्यानी बैठक बोलावली होती.

क्वीन्स रोडच्या जुन्या रेडिओ ऑफिसात ही बैठक झाली. कोणत्या नात्याने

कोण जाणे पण खुशवंत सिंह हजर होते, असं आठवतं. महाराष्ट्र राज्याचे काही वरिष्ठ अधिकारी होते.

कॅनेडिअन 'नॅशनल फार्म रेडिओ फोरम' च्या धर्तीवर भारतीय आकाशवाणीनं शेतकऱ्यांसाठी कार्यक्रम करावेत म्हणून युनेस्कोनं १९,००० डॉलरची मदत भारत सरकारला देऊ केली होती. प्रायोगिक धर्तीवर ही योजना प्रथम मुंबई राज्यात राबवली जावी असंही युनेस्कोच्या डायरेक्टर जनरलनी भारत सरकारला लिहिलेल्या पत्रात म्हटलेलं होतं.

साहजिकच कार्यक्रमाची आखणी आणि प्रसारण ह्यासाठी पुणे केंद्राची निवड झाली होती, आणि पुणे केंद्रावर रूरल प्रोग्रॅम प्रोड्यूसर म्हणून नेमणूक झाल्यावर मला ह्या बैठकीला हजर रहावं लागलं होतं.

ह्या बैठकीत महत्त्वाचे दोन निर्णय घेण्यात आले. एकच भाषा जिथे बोलली जाते अशा मर्यादित भागातच ही योजना राबवली जावी, आणि ही योजना पूर्ण झाल्यावर मूल्यमापन करण्याचं काम आकाशवाणी ऐवजी बाहेरच्या कोणा नामवंत संस्थेवर सोपवावं.

ही योजना पार पाडणे म्हणजे मोठाच (आय.सी.एस्.) खटला होता. आकाशवाणीचे डायरेक्टर जनरल श्री जगदीशचंद्र माथुर, हे अध्यक्ष आणि मुंबई सरकारच्या प्रसिद्धी, शिक्षण, शेतकी, आरोग्य ह्या खात्यांचे प्रतिनिधी, शासनाबाहेरचे दोघे आणि आकाशवाणी मुंबई केंद्र आणि पुणे केंद्र यांचे केंद्राधिकारी अशी एक प्रमुख समिती नेमली गेली. ह्या समितीनं निर्णय घेतला की पुणे, अहमदनगर, नाशिक, उत्तर सातारा, आणि कोल्हापूर जिल्ह्यातील ग्रामीण भागांत ही योजना राबवावी. एकूण एकशेपन्नास गावं निवडावी. निवडलेल्या गावांपैकी प्रत्येक गावात सार्वजनिक रेडिओ सेट असेलच असं नाही. विस्तार-योजना आणि इतर योजनांखाली त्यातल्या शंभर गावांत रेडिओ सेट होते. बाकी पन्नास गावांपैकी पंचवीस गावांना माहिती आणि नभोवाणी खात्यानं रेडिओसेट पुरवले तर पंचवीस गावांना युनेस्कोकडून मिळालेल्या फंडातून ते दिले गेले. म्हणजे पहिली अडचण दूर झाली.

ह्या पाचही जिल्ह्यांसाठी खेडूत-कार्यक्रम पुणे केंद्रानं द्यावेत आणि 'नभोवाणी शेतकरी मंडळा'ची स्थापना करण्याचं कामही पुणे केंद्रानंच करावं असं ठरलं. केंद्र संचालकांनी मग एक चीफ ऑर्गनायझर, पाच जिल्हा ऑर्गनायझर (हे पाच अधिकारी मुंबई सरकारच्या शेतकी, डेव्हलपमेंट, शिक्षण, पब्लिसिटी ह्या खात्यांतून घेतले होते) आणि इतर चाळीस पार्टटाईम ऑर्गनायझर यांची नेमणूक केली.

कार्यक्रमासाठी दिवस कोणते ठरवावेत, प्रत्येक फोरम मध्ये किती सभासद असावेत, अध्यक्ष कोण असावा ह्याविषयी चर्चा झाली. फोरमसाठी गाव निवडताना सुद्धा ही गावं शहरापासून दूर अशी असावीत, तिथं पोस्ट असावं याची काळजी घ्यावी असं ऑर्गनायझरनं सुचवलं. दिवस ठरवताना, आठवड्यातून दोन दिवस, तीस तीस मिनिटांचे हे कार्यक्रम असावेत आणि हे दिवस रविवार आणि गुरुवार असे असावेत असं ठरलं. बऱ्याच गावांना शनिवारी आठवडा बाजारांना जावं लागते; भाजीपाला, धान्यधुन्य विकायला आणि घरी लागणारे चहा साखर, कापडचोपड असला बाजार करायला. शिवाय काही गावांत सोमवारी चाक फिरत नाही, 'पाळणूक' असते. म्हणजे त्या दिवशी मोट धरायची नाही. बैलगाडी चालवायची नाही. का तर, एक दिवस बैलांना सुट्टी मिळावी.ह्या सगळ्या गोष्टी विचारात घेऊन रविवार आणि गुरुवार हे दिवस ठरवले गेले.

ग्रामीण जीवन आणि गावकऱ्यांचे प्रश्न ह्यासंबंधीची माहिती असलेल्या तज्ञांची समितीही नेमण्यात आली. ह्या समितीशी विचारविनिमय करून विषय निवडावे आणि मुंबई आकाशवाणी केंद्र आणि पुणे आकाशवाणी केंद्र ह्या दोन्ही केंद्राचे प्रोड्यूसर ह्यांनी कार्यक्रम तयार करावेत असं ठरलं. मुंबई केंद्राचे रुरल प्रोग्रॅम प्रोड्यूसर व्यंकटेश माडगूळकर ह्यांच्यावर कार्यक्रमाची जबाबदारी सोपविण्यात आली एकूण वीस कार्यक्रम प्रसारित होणार होते. प्रत्येक कार्यक्रम तीस मिनिटांचा होता.

पुणे, अहमदनगर, नाशिक, उत्तरसातारा आणि कोल्हापूर ह्या जिल्ह्यांतील फोरमसाठी निवडलेला ग्रामीण भाग पंचवीस हजार चारशे पंचावन्न चौरस मैलांचा होता. धर्म आणि भाषा ह्या दोन गोष्टीमुळे हा एकसंध होता. पंचाहत्तर गावं विकास योजना जिथं सुरू झाली आहे अशी आणि सत्तर गावं विकास योजना अजून सुरू व्हायची आहे अशी एकशेपंचेचाळीस गावांची अखेर निवड झाली.

जानेवारीच्या पहिल्या आठवड्यापासून फेब्रुवारीच्या तिसऱ्या आठवड्यापर्यंत एकशेपंचेचाळीस नभोवाणी शेतकरी मंडळांची स्थापना झाली. प्रत्येक मंडळात बारापासून वीस पर्यंत सभासद होते. पैकी जास्त संख्या पुरुषांची, शेतकऱ्यांची. स्त्री - सभासद कमीच मिळाल्या. पुरुषांत येऊन बसणं बोलणं त्यांना अवघड. शिवाय घरं, मुलंबाळं ह्या व्यापातून ठराविक दिवशी, ठराविक वेळेला, ठराविक ठिकाणी जमणं हे ही अवघडच. तात्पर्य स्त्रियांची संख्या फारशी नव्हती. चेअरमन म्हणून गावचे पाटील, सरपंच, शाळामास्तर असे कोणी प्रतिष्ठित माणूस असणं बरं, त्यांमुळे मंडळ रुळावर राहतं. म्हणून अशापैकीच कोणी मंडळाचे चेअरमन केलं गेलं. मंडळात कसणाऱ्यांच्या जोडीनं कारू नारू, आलुते बलुते ह्या

सगळ्यांना वाव देण्यात आला. सभासद करून घेण्याअगोदर, गावचे पाटील, सरपंच, कार्यकर्ते, शाळामास्तर यांचा सल्ला ऑर्गनायझरनी घेतलाच, पण सभासदांना कामाची कल्पनाही दिली. त्यांनी आठवड्यातून दोनदा होणारे कार्यक्रम लक्षपूर्वक ऐकायचे, कार्यक्रमात काय सांगितलं ह्याविषयी आपसात चर्चा करायची. आपलं मत मांडायचं. वाटलं तर सूचनाही करायच्या. शिवाय, एखादा कार्यक्रम ऐकून स्वतः काही करायचं ठरवलं तर ते करायचं आणि तसं वेळोवेळी मंडळात सांगायचं. म्हणजे कार्यक्रम ऐकल्यानंतर चेअरमननं रेडिओ केंद्राला जो फॉर्म भरून पाठवायचा असतो त्यात नोंद होईल.

आकाशवाणी केंद्राकडून प्रत्येक मंडळाला छापील फॉर्म पाठवला जाई. पोस्टाच्या खर्चासाठी काही ठराविक रक्कम चेअरमनला दिली जाई. मंडळाच्या बैठकीत काय झालं ह्याची नोंद करून मंडळाचा कनूव्हीनर त्याच्या तीन प्रती करी. एक प्रत आकाशवाणी केंद्राला, एक प्रत जिल्हा ऑर्गनाइझरला, आणि एक प्रत मंडळाच्या फाईलला.

वीस विषय निवडण्यासाठी नेमलेल्या समितीनं कोरडवाहू शेती, कोंबडी-पालन, गुरांची सुधारणा, चांगला गूळ कसा कराल?, वैदूगिरी, पिण्याच्या पाण्याची सोय, बालवाडी, फळबाग, उंदरांचा बंदोबस्त, प्रौढशिक्षण आणि खेड्यासाठी वाचनालयं, शेणखत, सहकारी विक्री इत्यादीचे वीस विषय सुचवले.

अखेर कार्यक्रम तयार झाले ते असे.

**कार्यक्रम - १**

नवे भारूड : दार उघड बया

ह्या भारुडाची देवी म्हणजे पोतराजाच्या डोक्यावरच्या पेटीतला रेडिओ सेट. हा अडचणीवर उपाय सुचवतो.

**कार्यक्रम - २**

सोयरीक मांडली, आणि जमली.

(१) श्रुतिका : आदर्श खेड्यातली नवरी मुलगी आणि जुन्या अस्वच्छ खेड्यातला नवरामुलगा यांचं लग्न ठरता ठरता मोडतं. मुलीच्या बापाला नवरा मुलगा चांगल्या कुळातला आहे आणि घरची स्थिती सुबत्ता असलेली अशी आहे, एवढं पुरेसं वाटत नाही. त्या गावात मुलगी नांदणार ते गाव सर्वार्थानं दर्जेदार असलं पाहिजे असा मुलीच्या बापाचा आग्रह असतो. जुने संबंध टिकविण्यासाठी नवऱ्या मुलाचा बाप पैजेनं थोड्या काळात आपलं गांव सुधारतो आणि मोडलेली

सोयरीक जमते.

(२) गाव सुधारणेसाठी राबलेल्या कार्यकर्त्याची मुलाखत

**कार्यक्रम - ३**

आम्हीच आमचे राजे

लोकशाही ही संकल्पना स्पष्ट करणारी श्रुतिका. लोकशाहीत प्रत्येक नागरिकानं आपला वाटा कसा उचलावा, आपल्या मताचं महत्त्व, ग्रामपंचायतीचा कारभार आदर्श कसा होईल ? याचा ऊहापोह.

**कार्यक्रम - ४**

फळबागा

चर्चा, फळांचा शरीराला काय उपयोग आहे? कोणत्या भागात कोणती फळ चांगली येतात? उत्तम जातीची पन्हेरी कुठं मिळते? ही माहिती ह्या कार्यक्रमात होती. (पन्हेरी म्हणजे मातीसकट रोपांचा गठ्ठा)

**कार्यक्रम - ५**

आंधळी लक्ष्मी

(१) श्रुतिका : प्रौढशिक्षण हा विषय. गावात वाचनालय कसं सुरू करावं? प्रौढशिक्षणासाठी कोणती पुस्तके आहेत?

(२) सोशल एज्युकेशन अधिकाऱ्याची मुलाखत.

(३) फोरमकडून विचारल्या गेलेल्या प्रश्नांना उत्तरे.

असे एकूण वीस कार्यक्रम होते. ह्या कार्यक्रमांसाठी नेहमीची 'गावकरी फड' ह्या शेतकऱ्यासाठी रोज होणाऱ्या कार्यक्रमाची पद्धत बदलली होती. लोकसंगीत, वाद्यसंगीत यांचा उपयोग करून घेतला होताच पण प्रमुख प्रकार दोन होते. पहिला म्हणजे, श्रुतिका, लोकनाट्य, चर्चा, मुलाखत, भाषण. दुसरा म्हणजे प्रश्नांना उत्तरं. फोरमच्या सभासदांनी, झालेला कार्यक्रम ऐकून काही शंका काढलेल्या असत. काही प्रश्न विचारलेले असत, काही टीका केलेली असे. ह्याला तज्ज्ञांकडून उत्तरं दिली जात.

एकूण वीस कार्यक्रमांतले चार लाइव्ह. ह्यातले तीन आकाशवाणीच्या स्टुडिओतून प्रसारित झाले आणि उद्घाटनाचा 'बया दार उघड' हा कार्यक्रम निमंत्रित श्रोत्यांसमोर हडपसर गावी झाला. तो तिथूनच प्रसारित करण्यात आला. विशेष म्हणजे ह्या कार्यक्रमात हडपसरच्या एका वृद्ध शेतकऱ्याचे आशीर्वादपर भाषण प्रमुख होतं. सोळा कार्यक्रम आधी ध्वनिमुद्रित केलेले होते. पैकी दोन प्रत्यक्ष खेडेगावी जाऊन ध्वनिमुद्रित केलेले होते.

१९ फेब्रुवारी ते २६ एप्रिल १९५६ ह्या कालावधीत प्रसारित झालेले हे वीस कार्यक्रम रविवार आणि गुरुवार असे आठवड्यातून दोन वेळा झाले. प्रत्येक कार्यक्रम तीस मिनिटांचा होता आणि वेळ संध्याकाळी साडेसहा ते सात अशी होती. ह्या कार्यक्रमांसाठी सिग्नेचर ट्यून मात्र नेहमीच्या गावकरीफडापेक्षा वेगळा होता. खास गावाकडची चाल आणि वाद्ये यांचा सुरेख मेळ ह्या तुकड्यात होता. पुणे केंद्राचे कल्पक आणि गुणवंत म्युझिक प्रोड्यूसर श्री. गोळवलकर यानी हा केला होता का काही काळ आकाशवाणी केंद्रावर वादक म्हणून चाकरीत होते त्या श्री. राम कदम ह्यांनी केला होता हे मला आज नक्की आठवत नाही.

शेतकऱ्यांना, गांवकऱ्याना उपयोगाची अशी काही नवी माहिती रेडिओवरून देता येते का हे अजमावण्याच्या हेतूने ही योजना आखलेली होती. श्रोता एकटा नव्हता, बरेच होते. छोट्याशा जमावाला उद्देशून हे कार्यक्रम होते. त्याचं फलित काय हे पाहणं जरुरीचंच होतं. हे मूल्यमापनाचं काम मुंबईच्या टाटा इन्स्टिट्यूट ऑफ सोशल सायन्सेस ह्या संस्थेच्या सोशल रीसर्च डिपार्टमेंटकडे सोपविण्यात आलं. सुरुवातीला डॉ. ए. एम्. लोरेंझो आणि डॉ. पॉल न्यरथ (Neurath) फुलब्राईट प्रोफेसर ऑव्ह सोशल रीसर्च हे दोघे काम पाहत होते. मे ५६ मध्ये माहिती जमविण्याचं काम संपल्यावर डॉ. लोरेन्झो टाटा इन्स्टिट्यूट मधून भारत सरकारच्या ब्युरो ऑफ लेबर खात्यात डायरेक्टर ह्या पदावर गेले आणि सर्व काम डॉ. न्यूरथनी केलं.

एकूण फोरमपैकी वीस गावं डॉ. लोरेंझो आणि डॉ. पॉल न्यूरथ यांच्याकडून तपासली गेली. कार्यक्रमाच्या आधी शेतकरी मंडळाच्या सभासदांना असलेली माहिती आणि कार्यक्रम ऐकल्यानंतर त्यांना झालेली माहिती तपासून निष्कर्ष काढण्यात आले.

डॉ. न्यूरथ ह्यानी स्वतः वीस पैकी पंधरा फोरमना भेट दिली. कार्यक्रम ऐकल्यानंतर सभासदांनी केलेली चर्चा डॉ. न्यूरथ यांनी चार गावात जाऊन ऐकली. त्यांच्या बरोबर चीफ् ऑर्गनायझर श्री. डी. डी. जाधव, फील्ड सुपरवायझर श्री. जी. आर. पटेल आणि त्या जिल्ह्यासाठी नेमलेले ऑर्गनायझर मराठीत चाललेली चर्चा श्री. जाधव आणि श्री पटेल डॉ. न्यूरथ ह्यांना वाक्यन वाक्य भाषांतरित करून सांगत. फोरमच्या सभासदांना डॉ. न्यूरथ प्रश्न विचारत. नारू हा आजार कसा होतो? मलेरिया कशाने होतो? हे तुम्हाला कसं कळलं? शाळेत सांगितलं होतं का? तालुक्याला गेल्यावर कळलं का? रेडिओवर सांगितलेलं कुणी ऐकलं? नारूवर उपाय काय? मलेरियावर ? हे उपाय तुम्ही केव्हापासून करत आहात? उंदरांकडून तुमचं काय नुकसान होतं? उंदरांना घालायच्या विषासंबंधी माहिती

कुणा कुणाला आहे? रेडिओकडून माहिती कळली का? असे हे प्रश्न असत.

कार्यक्रमाप्रमाणे फोरमसंबंधीही प्रश्न असत. तुमच्या ह्या मंडळात स्त्री-सभासद का बरं नाहीत? सभासदाची निवड कशी करावी असं वाटतं? समजा, जिल्हा ऑर्गनायझर नाहीतच तरी तुम्ही सभासद निवडू शकाल का? (ह्यावर उत्तर मिळे की, काही दिवस आम्हाला बाहेरची मदत लागेलच) मंडळाचा चिटणीस म्हणून काम करणाराला पगार पाहिजे होता का? हे काम ग्रामपंचायतीच्या सेक्रेटरीनीच करावे काय का शाळा मास्तरनी करावे; का आणखी कोणी?

शेतकरी मंडळाकडे टिपण असे. उपस्थिती, पास झालेले ठराव, प्रत्यक्षात आणलेल्या सूचना याचे सर्व रेकॉर्ड पहायला मिळे. नाशिक जिल्ह्यातील वडाळा भोई मंडळाने सूचना लिहून सादर केल्या त्या अशा होत्या -

(१) नभोवाणी शेतकरी मंडळ प्रत्येक खेड्याला असावे. गावकऱ्यांपैकीच सभासद निवडावेत.

(२) ही योजना कायम चालू रहावी. नभोवाणी शेतकरी मंडळाला गावातली एक सार्वजनिक संस्था म्हणून मान्यता मिळावी.

(३) सेक्रेटरी कायम करावा.

(४) शासनाच्या अधिकाऱ्यांचे मार्गदर्शन नेहमीच मिळावे (म्हणजे जिल्हा ऑर्गनायझर कायम व्हावा).

(५) आठवड्यातून एकत्र कार्यक्रम आकाशवाणीवर असावा. मात्र तो एकातासभरचा असावा.

वडाळा भोईच्या ग्रामपंचायतीत नभोवाणी शेतकरी मंडळाच्या सभासदांची यादी फ्रेम करून भिंतीवर लावली होती. जे वीस कार्यक्रम झाले तेही भिंतीवर लावले होते.

नाशिक जिल्ह्यातील असखेडा गावातल्या मंडळाने सूचना केल्या होत्या -

(१) कार्यक्रमाची वेळ संध्याकाळी आठ वाजून तीस मिनिटांनी अशी ठेवावी.

(२) नावाला अनुरूप असे फक्त शेती संबंधीचेच कार्यक्रम असावेत.

(३) कार्यक्रमासाठी कमी वेळ आहे. वाढवावा.

(४) प्रगत शेतकऱ्यांच्या आणि सार्वजनिक हिताची कामे करणाऱ्या कार्यकर्त्यांच्या मुलाखती ठेवाव्यात.

(५) कधीकधी लोकगीते इत्यादीही कार्यक्रमात असावेत.

(६) प्रगत गाव कसे असते ह्याची कल्पना द्यावी.

(७) सभासदांनी विचारलेल्या सर्व प्रश्नांची उत्तरे कार्यक्रमात असावीत.

(८) शेतकरी मंडळाच्या कार्यक्रमात, खेड्यातल्या कलाकारांनाही संधी मिळावी.

(९) आठवड्यातून एक कार्यक्रम अहिराणी भाषेत असावा.

(१०) आम्ही मंडळ सुरू ठेवले तर शासनाचे मार्गदर्शन होईल का?

नभोवाणी शेतकरी मंडळाच्या कार्यक्रमाबाबत नाशिक आणि पुणे हे दोन जिल्हे फार उत्साही आढळले. सातारा त्या मानाने कमी. अहमदनगरमध्ये साताऱ्यापेक्षाही कमी.

हे विशेष कार्यक्रम लोकांना कसे वाटले हे जाणून घेण्याची आम्हांला उत्सुकता होती. मराठी खेडं आम्हाला माहित होतं का? आम्ही कार्यक्रमात वापरली ती भाषा बरोबर होती का? कार्यक्रमासाठी निवडलेले रविवार आणि गुरुवार हे दिवस सोयीचे होते का?

नाशिक जिल्ह्यातील काही खेड्यात अहिराणी भाषा बोलली जाते ही खेडी सोडली तर इतर सर्वांना आमची भाषा कळली. काही शेतकरी मंडळांनी ठपका ठेवला की 'फार पुणेरी मराठी' कार्यक्रमात बोलली गेली. ह्या उलट काही मंडळांचं मत पडलं की 'ग्रामीण बोली ऐवजी शुद्ध पुणेरी मराठी आम्हांला हवं होतं.

गुरांची सुधारणा ह्या विषयावरच्या कार्यक्रमाविषयी प्रश्न विचारले तेव्हा शेकडा एक्याण्णव सभासदांनी कार्यक्रम उत्तम झाल्याचे सांगितले.

'आंधळी लक्ष्मी' हा प्रौढ शिक्षणावरचा कार्यक्रम. तेव्हा शेकडा सत्तर लोकांनी सांगितलं की आम्हाला प्रौढ शिक्षणाबाबत काम करावं, असं वाटतं. शेकडा चवदांना वाटलं की आपण लिहावाचायला शिकावं आणि कुटुंबातील इतरांनीही शिकून घ्यावं. काही थोडे नकार देणारेही आढळले. एक जण म्हणाला, "कसं काय हो शिकवायचं बायकूला, लोक हसतील की!" एकजण म्हणाला, आईला कशाला शिकवू? ती लई म्हातारी झालीय. सातारा जिल्ह्यातील एका गावात, 'बायका कधीच शिकायच्या नाहीत' म्हणणारे सहा जण निघाले.

'नवा देवऋषी' ह्या कार्यक्रमाविषयी विचारल्यावर काहीजणांचं मत पडलं की, मनोरुग्णावर इलाज करायचा तर देवऋषीच पाहिजे. लागीर झाल्यावर डॉक्टरचा काही इलाज नसतो. काहीजण म्हणाले, देवऋषीला अगदीच बाद नाही करता येत. काही रोगावर तो झाडपाल्याचं औषध सांगतो. काही म्हणाले, 'डाक्टरपेक्षा देवऋषी स्वस्तात मिळतो.'

कार्यक्रमात सुचवलेलं तुम्ही कराल का, ह्या प्रश्नाची शेकडा साठ ते ऐंशी जणांनी 'करूच' किंवा 'करूनच बघू' असं उत्तर दिलं.

आम्ही आठवड्यातून दोन कार्यक्रम दिले होते. हे दोन बरे का एक बरा ह्यासंबंधी विचारल्यावर एकच कार्यक्रम असावा असं म्हणणारे सर्वात जास्ती सभासद निघाले. दोन पाहिजेत म्हणणाऱ्याचा दावा असा की कामधंद्यामुळे एक

चुकला तर दुसरा तरी ऐकता येतो. दिवस कोणते सोयीचे पडतात ह्या प्रश्नाला उत्तर होतं की एकच कार्यक्रम आठवड्यातून असेल तर रविवार चांगला. दोन असले तर रविवार आणि गुरुवार हेच सोयीचे. संध्याकाळी सहातीस ते सात ही वेळा फार लवकरची आहे आहे असं लोकाचं मत होतं. साडेसात ही सर्वानुमते उत्तम वेळ होती. शेकडा बावन्न सभासंदानी कार्यक्रमांना अर्धातास हा वेळा पुरेसा आहे असं सांगितलं.

नभोवाणी शेतकरी मंडळ ही खेडेगावातील लोकासाठी फार उपयोगी अशी योजना आहे. ही महाराष्ट्रातल्या सगळ्या जिल्ह्यांत लागू करावी आणि ती काही मर्यादित काळासाठी न ठेवता सततची करावी, असं मत बहुसंख्य सभासदांचं पडलं.

पुणे केंद्राकडून महाराष्ट्रातल्या पाच जिल्ह्यांत पार पाडली गेलेली आणि यशस्वी ठरलेली ही योजना जम्मू काश्मीर सोडून सर्व राज्यात पुढे लागू करण्यात आली.

योजना सुरू झाली तेव्हा सगळंच नवीन होतं. पुणे आकाशवाणी केंद्र नुक्तंच सुरू झालेलं होतं. प्रोड्यूसर म्हणून मी अगदीच नवा होतो. 'गावकरी फड' हा रेडिओचा कार्यक्रम मुंबई केंद्राकडून पुण्याकडे नवीनच आलेला होता. तो चांगला बळकट व्हावा म्हणून नवे लोक घेणं आवश्यक होतं. शेतकरी मंडळाची योजना सुरू होण्याअगोदर स्टेशन डायरेक्टर श्री. चावला ह्यांनी मला सांगितलं की, तुमच्या डिपार्टमेंटमध्ये मंजूर झालेल्या जागा तुम्हीच योग्य ती माणसे निवडून भरा.

स्क्रिप्ट रायटर श्री. मधुकर कुलकर्णी, स्टाफ अर्टिस्ट जयराम कुलकर्णी, श्री. कृष्णराव सपाटे, श्रीमती पद्मा काकनूरकर अशी गुणी माणसं मला जमवता आली. ही खेड्यातच जन्मलेली वाढलेली होती आणि त्यांना आकाशवाणीवर काम करण्यात रस होता. खेड्याविषयी आपुलकी होती. तिथली माणसं, तिथली भाषा, रीतीरिवाज, शेती, गुरंढोरं हे सगळं त्यांना चांगलं माहीत होतं. चीफ ऑर्गनायझर डी. डी. जाधव, श्री. कळसकर, श्री. इनामदार असली माणसं एकत्र येणं हे दुर्मिळच. एखादी गोष्ट जमून जाते. सूर सापडतो आणि मैफल रंगते. नभोवाणी शेतकरी मंडळाबाबत असंच झालं.

आता काळ खूप बदलला आहे. नभोवाणी शेतकरी मंडळं आता नाहीत. ते आकाशवाणीचे कार्यक्रम वाऱ्यावर विरून गेलेत; पण आठवणी अजून आहेत. पाषाणावर खोदलेल्या चित्राप्रमाणे त्या कायम राहतील.

आपली आवड आणि चरितार्थासाठी करावी लागणारी चाकरी ही एकच असणं ही फार क्वचित लाभणारी संधी असते. ती आम्हांला लाभली आणि नभोवाणी शेतकरी मंडळं ही योजना आम्ही यशस्वीपणाने पार पाडू शकलो. आम्हा

सर्वांना लाभलेलं समाधान हेच त्याबद्दल मिळालेलं मोठं पारितोषिक आहे.

**संदर्भ**

जगदीशचंद्र माथुर, पॉल न्यूरथ, ॲन इंडियन एक्स्पेरिमेंट इन फार्म रेडियो फोरम्ज. पॅरिस : युनेस्को, १९५९. १३२ पृष्ठे; ५ प्रकाशचित्रे. (पुस्तकातला भाग १ माथुर आणि भाग २ न्यूरथ यांनी लिहिलेला आहे. सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी, पुणे यांच्या ग्रंथालयात उपलब्ध.)

**अक्षर, ११०।१०, प्रभात रस्ता, १४ वी गल्ली, पुणे ४११ ००४**



**येशू कृतीमधून लोकशिक्षण करतो**

यहुदी लोकांचा सीमोल्लंघन सण आला आणि येशू जेरुसलेमला जाऊन पोचला.

आणि त्याने पाहिले की देवळात गाईबैल आणि मेंढ्या आणि कबूतरे (बळी देण्यासाठी म्हणून) विकणारे आणि सराफ-मंडळी येऊन बसलेली आहेत.

आणि मग त्याने लहानसहान दोऱ्यांचा एक आसूड वळला आणि या सगळ्यांना देवळातून हाकून लावले आणि मेंढ्यांना आणि गुरांनाही काढून लावले, आणि सराफ कट्ट्यावरच खुर्द्याच्या राशी ढकलून दिल्या आणि टेबले उलटून टाकली.

आणि कबुतरविक्यांना तो म्हणाला, यांना इथून घेऊन जा, माझ्या पित्याच्या या घराचा बाजार बनवू नका.

आणि त्याच्या शिष्यांना आठवले की असे लिहून ठेवले आहे की, तुझ्या घरावरच्या निष्ठेने माझा घास घेतला आहे.

जॉनचे शुभवर्तमान : १३ -१७ (शेवटच्या वाक्यातल संदर्भ, बायबल : जुना करार : स्तोत्रपाठ : ६९:९)





अनुक्रमणिका

# श्रीसमर्थ रामदास आणि लोकशिक्षण

**मु. श्री. कानडे**

समर्थ रामदासांनी समाजाला दिलेली शिकवण त्यांच्या साहित्याच्या आधारे एकत्रित करणे हे काम फार गुंतागुतीचे आहे. त्यांनीच स्वतः सांगितल्याप्रमाणे 'ज्याचा ज्याचा जो व्यापार । तेथे असावे खबरदार।' या सूत्रानुसार त्यांच्या साहित्यांतर्गत शिक्षणाची पद्धतशीर मांडणी करणाऱ्याला अतिशय सावधान राहणे आवश्यक आहे. रामदासांच्या वाङ्मयाचे स्वरूपही मोठे अभ्यसनीय आहे. स्वतंत्र ग्रंथरचना, स्फुट प्रकरणे, आख्यानक कविता, प्रासंगिक कविता, अशा विविध स्वरूपात त्याची रचना झालेली आहे. त्या सर्व साहित्याचे सर्वांगीण अध्ययन एक वेळ सोपे वाटावे असे, ते निर्माण करणाऱ्या रामदासांचे व्यक्तिमत्त्व विविध पैलूंनी नटलेले, प्रभावशाली आणि अत्यंत व्यामिश्र स्वरूपाचे असे आहे. हे व्यक्तिमत्त्व एका बाजूला जुन्या परंपरेला अनुसरणारे आहे तर दुसरीकडे अनेक नव्या पंरपरांना जन्म देणारे आहे. रामदासांचे व्यक्तिमत्त्व पंरपरांचा आदर करणारे असले तरी ते साचेबंद नाही किंवा ठरीव विचारांनाच चिकटून बसणारे नाही. बारा वर्षांचो भ्रमंती करीत असताना रामदासांनी आपल्या समाजस्थितीचे जे डोळस आवलोकन केले त्याच्या प्रभावाने त्यांच्या व्यक्तिमत्वाचे स्वरूप व्यापक व प्रखर झाले. आपल्या पूर्वायुष्यातील विचारांना समाजहितैषी अशा नव्या विचारांची जोड देणे, अवश्य असेल तेथे जुन्या प्रतिपादनाचे पुनरावलोकन करून त्याला समयोचित दिशा देणे, मोक्षैकनिष्ठ अशा वेदांतविचाराच्या कक्षा विस्तृत करून आपले त्या प्रतिपादनाबरोबरच ऐहिक सुखसमृद्धीकडे नेणाऱ्या सूत्रांचीही मांडणी करणे अशा विविध घटकांनी रामदासांची शिकवण सर्वस्पर्शी झालेली आहे. ते प्रवृत्तीने स्थितिशील नसून परिवर्तनशील, गतिशील आहेत. त्यांचा श्रोतृवर्गही एक स्वरूपाचा नाही. साधकावस्थेतील जिज्ञासू शिष्य, सर्वसंगपरित्याग करून परमार्थाच्या प्रसारासाठी निघालेले महंत, कौटुंबिक प्रपंचाचा गाडा हाकणारे गृहस्थाश्रमी, धर्मरक्षणासाठी स्वतंत्र सिंहासन उभारणारे शिवछत्रपती आणि त्यांचे निष्ठावंत क्षात्रधर्मी सहकारी अशा भिन्न भिन्न क्षेत्रातील श्रोत्यांचे गट रामदासांकडून योग्य मार्गदर्शनाची वाट पाहत होते. रामदासांच्या तपश्चर्येमुळे, समाजनिरीक्षणामुळे आणि दूरदृष्टीमुळे या सर्व थरातील समाजघटकांना त्यांचे जीवन कृतार्थ करील अशी शिकवण देण्याची योग्यता त्यांना प्राप्त झालेली होती. 'आत्माराम आणि दासबोध हे आपले स्वतःसिद्ध स्वरूप पुढील पिढ्यांसाठी मागे ठेवलेले आहे' या रामदासांच्या





अनुक्रमणिका

आश्वासनाला त्यांच्या इतर साहित्याच्या अभ्यासाची साथ मिळाली आणि या समग्र साहित्याच्या आलोकनातून त्यांची समाजशिक्षणाची सूत्रे शोधली म्हणजे त्याचे वैशिष्ट्यपूर्ण आणि आजही अनेक संदर्भात प्रेरक ठरणारे स्वरूप प्रत्ययाला येते. त्यांच्या साहित्य संभारातील भाषिक, पारमार्थिक, सामाजिक आणि राजकीय या चतुर्वर्गातील ठळक मतांचा येथे मागोवा घेण्याचा प्रयत्न केलेला आहे.

रामदासांच्या भाषाविचारांचा पूर्वी 'भाषा आणि जीवन' च्या एका अंकात परामर्श घेतलेला आहे. (वर्ष ३, अंक २) आपण स्वीकारलेल्या मराठी भाषेच्या माध्यमाचा रामदासांनी अनेक ठिकाणी पाठपुरावा केलेला आहे. ज्या ग्रंथात अद्वैत तत्त्वज्ञानाचे विवरण आहे त्याला 'प्राकृत' म्हणून हिणवू नये असे त्यांनी संस्कृतच्या अभिमानी पंडितांना बजावले आहे.

**ज्या ग्रंथी बोलिले अद्वैत । तो म्हणू नये प्राकृत । दास. ७.१०.४६**

संतकवींनी आपला परमार्थविचार सुगम होण्यासाठी मराठीचा स्वीकार केला, अन्यथा संस्कृतातील गहन प्रतिपादन सामान्य लोकांपर्यंत कसे पोचले असते असा सवाल करून रामदासांनी लोकभाषेच्या स्वीकाराचे आग्रहपूर्वक समर्थन केल्याचे जाणवते.

ते लिहितात,

**तथापी संस्कृताकरिता । संस्कृताची सार्थकता ।**
**येऱ्हवं त्या गुप्तार्था । कोण जाणे ?।।। दास. ७.१.४२**

संतकवींच्या अधिकारवाणीमुळे प्राकृताला म्हणजेच मराठीला संस्कृतच्या बरोबरीची योग्यता प्राप्त झालेली आहे हा ज्ञानदेवांनी फार पूर्वी केलेला दावा रामदासांच्या उद्गारांतही पुन्हा प्रकट झालेला आहे –

**आहे प्राकृत बोली । परी संस्कृताची एकता आली ।**
**जाणोनि कथा श्रवण केली । पाहिजे श्रोतीं ।। जुना दासबोध, २.१७**

रामदासांनी प्राकृत भाषेचा अवलंब करून विपुल लेखन केले त्यामागे स्वतः ज्ञानी होणे आणि इतरांनाही तोच ज्ञानोपासनेचा मार्ग दाखविणे ही त्यांची भूमिका स्पष्ट झालेली आहे. दासबोधाच्या अगदी प्रारंभीच्या समासात आपण कोणकोणत्या 'ग्रंथांच्या संमती' घेतलेल्या आहेत त्यांची रामदासांनी जी यादी दिली आहे ती पाहिली म्हणजे आपल्या तेरा ते चोवीस वर्षांच्या काळात टाकळी येथे त्यांनी जी ज्ञानसाधना केली होती तिची कल्पना येते. ज्ञाननिष्ठेला त्यांनी आपल्या जीवनात महत्त्वाचे स्थान दिले आणि आपल्या शिष्यपरिवारालाही सातत्याने ज्ञानसंग्रह करण्याचा आग्रह केला. माणसाचे मोठेपण हे त्याच्या वयावरून ठरत नसून ते

गुणवत्तेने येते (गुणेंविण वडिलपण । हें तो अवघेंचि अप्रमाण ।। दास. १५.३.१०) ही धारणा असल्याने रामदासांनी ज्ञान संपादन करण्याचा व ते इतरांना देण्याचा उपदेश केलेला आहे. पुढील वचनांवरून याची कल्पना येते -

**नाना शास्त्रं धांडोळावी ।। दा. २.४.८**
**ज्ञान शिकवी अज्ञाना । तो सत्वगुण ।। दा. २.७.७९**
**विरक्तें शास्त्रें धांडोळावी ।। दा. २.९.३६**
**सकळ रक्षून ज्ञान सांगे ।। दा. ४.२.२६**
**अखंड एकांत सेवावा । अभ्यासचि करीत जावा ।।**
दा. ११.१०.१०
**जाता देवाचा अंश । नेणता म्हणजे तो राक्षसांश ।।**
दा. १७.७.१४

या अखेरच्या वचनात तर रामदासांनी ज्ञानी पुरुषाला देवपदावर प्रतिष्ठित केले आहे. दासबोधात काही समास तर संपूर्णपणे ज्ञानाच्या उपासनेलाच वाहिलेले आहेत. श्रवण (४.१) बहुधा ज्ञान (५.५), पुन्हा 'श्रवण' (७.८), पुन्हा 'श्रवण', (७.९) इ. समास या दृष्टीने अभ्यसनीय आहेत.

ग्रंथलेखन आणि ग्रंथपठन या गोष्टींच्या बाबतीतही रामदास जागरूक आहेत. दासबोधाच्या ११ व्या दशकातील 'महंतलक्षण' या समासाचा प्रारंभीचा भाग आदर्श लेखन कसे असावे याचा तपशील सांगण्यासाठीच रामदासांनी खर्ची घातलेला आहे. त्या काळातील ग्रंथाध्ययन हे मुख्यतः श्रवण आणि पठन या द्वारा होत असे. हे ग्रंथपठन अर्थ समजून न घेता मननपूर्वक झाले पाहिजे हे रामदासांनी आवर्जून आणि परखड शब्दांत सांगितले आहे.

**अपार असावं पाठांतर । सन्निधचि असावा विचार ।।**
दा. ११.५.१५
**अर्थांतर पाहिल्याविण । उगेंचि करी जो श्रवण ।**
**तो श्रोता नव्हे पाषाण । मनुष्यवेषें ।। दा. ८.६.७**
**अर्थाविण पाठ कासया करावे ।। स्फुट अभंग, क्र. ९८**

ज्ञानाच्या विविध शाखांचा अभ्यास करावा असे रामदासांचे प्रतिपादन असले तरी त्यांच्या दृष्टीने आत्मज्ञान ही ज्ञानाची सर्वश्रेष्ठ पायरी आहे हे त्यांनी वारंवार सांगितले आहे आणि त्याला अनुसरूनच त्यांनी काव्याचे चार प्रकार केलेले आहेत. धीट कवी, पाठ कवी, धीटपाठ कवी आणि प्रासादिक कवी असे रामदासांचे वर्गीकरण असून प्रासादिक काव्यच खरे काव्य अशी त्यांची भूमिका आहे. (दा. १४.३ कवित्वलक्षण). त्यांच्या 'महाराष्ट्रधर्मा'चे स्वरूप सूचित करणारी प्रसिद्ध

चतु:सूत्री पाहिली तरी त्यातही रामदासांनी 'हरिकथानिरूपणा'ला पहिले स्थान दिलेले आहे. परमार्थच जीवनाचे सार्थक करणारा आहे ही त्यांच्या विचारांची प्रेरणा जुना दासबोध आणि ग्रंथराज दासबोधाचा पूर्वार्ध यांमध्ये विस्तारपूर्वक प्रकट झालेली आहे.

ते म्हणतात,

परमार्थ जन्माचं सार्थक । परमार्थ संसारं तारक । दा. १.९.२१
परमार्थी तो राज्यधारी । परमार्थ नाही तो भिकारी । दा. १.९.२३
देह परमार्थी लाविलें । तरींच याचें सार्थक जाहलें ॥
दा. १.१०.६१

अन्य पंथीय संतांच्या प्रमाणेच रामदासांनी आपल्या परमार्थविचारात भक्तीला सर्वाधिक महत्त्वाचे स्थान दिले आहे. 'भक्तिचेनि योगें देव । निश्चयें पावती मानव' असा अभिप्राय दासबोधाच्या प्रारंभीच (दा.१.१.४) नमूद केल्यानंतर त्यांनी चवथ्या दशकात नवविधाभक्तीचे जे समग्र तपशीलवार विवरण केले, ते मध्ययुगीन वाङ्मयात तरी अद्वितीय आहे. अन्यत्रही त्यांनी भक्तीचा महिमा अनेकदा गायलेला आहे.

रामदास सांगे खुण। भक्तीविणें सर्व क्षीण । संशयपंचक, क्र.५
हरिभक्तिविण जाऊं नये क्षण। स्फुट अभंग, क्र. १८९
मना सज्जना भक्तिपंथेंचि जावे । मनाचे श्लोक, क्र. २
उठो आवडी भक्तिपंथेंचि जातां । करुणाष्टक क्र. ४, ओ.२

ही भक्ती निष्काम असावी असाही त्यांचा अभिप्राय आहे.

निष्काम भजनें भगवंत जोडे । दा. १०.७.२०

भक्तीमध्ये सगुणाचा किंवा निर्गुणाचा एकांती आग्रह न धरता रामदासांनी त्यांचा क्रम लाविला आणि तो 'सगुणाचेनि आधारें। निर्गुण पाविजे निधरि' (दा. ६.६.५५) या शब्दांत नमूद केला. रामदासांच्या सर्व परमार्थविचारात त्यांनी विवेकाला फार महत्त्वाचे स्थान दिलेले आहे. तो त्यांचा परमार्थविवेक सगुण-निर्गुणाच्या संदर्भातही दिसून येतो -

निर्गुणीं नाही कर्तृत्वहेत । सगुण तरी नाशिवंत ।
याकारणं सिद्धांत । विवेकें पहावा ॥ ध्यानपूर्वविचार, क्र. १९

भक्तीची साधना आणि साफल्य सद्गुरूच्या मार्गदर्शनाशिवाय लाभत नाही या निष्ठेने रामदासांनी सद्गुरूला देवाइतकेच आदरस्थान दिलेले आहे. त्यांच्या कोणत्याही मंगलाचरणात गणेश आणि शारदा यांच्या नंतरचे स्थान निरपवादपणे सद्गुरूला मिळालेले आहे; पण तो सद्गुरूही त्या योग्यतेचा पाहिजे असा

रामदासांचा नित्याचा आग्रह आहे. 'सद्‌गुरुलक्षण' या समासात (दा. ५.२) श्रेष्ठ अशा सद्‌गुरूचा महिमा परोपरीने सांगणाऱ्या रामदासांनी 'जनस्वभावगोसावी' या आपल्या छोट्या प्रकरणात ढोंगी गुरू आणि भोळे शिष्य यांचा सारखाच धिक्कार केला आहे. संतांच्या चरित्रात चमत्कार वर्णिले जात असले तरी त्यात गुरूची खरी थोरवी नाही हे आपल्या श्रोत्यांच्या नजरेला आणून रामदासांनी त्यांना गुरूस्तवनाचे खरे रहस्य त्याच प्रकरणाच्या अखेरीस पुढील शब्दात सांगितले आहे -

**ऐसें वर्तते लोकीं । येणें सार्थक नव्हे कीं ।**
**अध्यात्मविद्या विवेकीं । जाणितसे ।। ओवी क्र. ६८.**

रामदासांच्या या भक्तिप्रधान 'देवकारणा' मध्ये दोन गोष्टींचा मुद्दाम निर्देश केला पाहिजे. रामदासांच्या व्यक्तिमत्त्वामध्ये तत्त्व आणि व्यवहार यांचा समन्वय साधणारी वैचारिक बैठक आहे. त्यांनी कोदंडधारी रामाचे आणि रामभक्त हनुमानाचे आपल्या रामायणातच नव्हे तर इतरत्र उत्कटतेने गुणसंकीर्तन केले; पण त्याचबरोबर सर्वत्र पसरलेला शिष्यवर्ग आणि अखंड भ्रमंती यातून त्यांचा 'सर्वदेवसमभाव' व्यक्त झालेला आहे. विठ्ठल, शंकर, कृष्ण, गणपती, जगन्माता जगदेश्वरी, बहिरोबा, खंडोबा अशा लोकमानसावर प्रभाव असणाऱ्या अनेक उपास्यदैवतांच्या आरत्या रामदासांनी तेवढ्याच श्रद्धाभावाने रचलेल्या आहेत आणि समाजाला दैवत क्षेत्रातील समभावाची शिकवण दिलेली आहे. प्रत्येक समाजात परंपरेने चालत आलेल्या कुलदैवतांची भक्तिभावाने उपासना होत असते हे ध्यानात घेऊन रामदासांनी आपल्या उदार, समावेशक वृत्तीचा आविष्कार केलेला आहे.

परंतु हा व्यावहारिक सामंजस्याचा पैलू मांडून तात्त्विक दृष्टीने या अनंत देव-देवतांना निर्मिणारा एकच एक मोठा देव किंवा मुख्य देव आहे हे रामदासांनी पुन्हा पुन्हा सांगितले आहे. त्यांच्या वाङ्‌मयात या आशयाची कितीतरी वचने काढून दाखविता येतात -

**एक निश्चय तो ऐसा । मुख्य देव आहे कैसा ।**
**नाना देवांचा वळसा । करुचि नये ।। दा. ६.१०.२९**
**देव ओळखावा येक । तेंचि ज्ञान तेंचि सार्थक । दा. ६.१.२१**
**सकळ केलियाचें सार्थक । देव ओळखावा येक । दा. ९.१०.१३**
**मुळीं द्रष्टा देव तो येक । त्याचे झाले अनेक । दा. १९.५.६**
**रामदासीं देव एक । येर सर्वही पाईक ।। संशयपंचक , क्र. ३**
**अनेकीं सदा एक देवासि पाहे । मनाचे श्लोक, क्र. ४९**

भागवतधर्मीय संतांच्या तुलनेने रामदासांची सामाजिकच नव्हे तर पारमार्थिक विचारसरणीही संकुचित होती अशी शेरेमारी काही अभ्यासकांनी केलेली

आहे. रामदासांच्या वाङ्मयाचे बारकाईने परिशीलन करणारा कोणीही निराग्रही अभ्यासक वरील मताशी सहमत होणार नाही. कारण रामदासांनीही पारमार्थिक समतेचाच पाठपुरावा केलेला आहे हे त्यांच्या पुढील वचनांवरून स्पष्ट होते -

**चहु वर्णांस नामाधिकार । नामीं नाहीं लहानथोर । दा. ४.३.२४**
**ब्राह्मणाचें ब्रह्म ते सोवळें । शूद्राचें ते वोवळें ।**
**ऐसें वेगळें आगळें । असेचि ना ।। ७.२.२५**
**भेटो कोणी एक नर । धेड महार चांभार ।**
**त्याचें राखावें अंतर । या नाव भजन । करुणाष्टक, २१५-९**

रामदासांच्या मनोवृत्तीतील ही सहिष्णुता अन्य धर्मीयांच्या संबंधातही आहे. हिंदू धर्माच्या मानबिंदूचा विध्वंस करणाऱ्या दुर्जनांचा निःपात करावा असे त्यांनी आवेशाने सांगितले; पण ते फक्त धर्मवेड्या अत्याचारी लोकांच्या बाबतीतच होते हे मुद्दाम ध्यानात ठेवले पाहिजे. सर्व मानव एकाच ईश्वराची लेकरे आहेत हे त्यांनी एका पदात सांगून आपापसात लढू नये असा उपदेश केला आहे -

**'अल्ला निरंजन दोउ नाही रे ।'**
**भाई, काहेकु लडते । लडते तो पडते भाई ।।**
**येक जीमीन येकही पानी येक आतश असमान ।।**
**येक मेहु आलम चलाता येकक चंद सुभान ।।**

परमेश्वराची प्राप्ती सर्वांनाच होऊ शकते अशी त्यांची उदार विचारसरणी आहे -

**जोगी जंगम आणि सोपी (= सूफी) । फकीर कलंदर नानारूपी।**
**येणेंचि मार्गे स्वरूपी । पावती सकळ ।। निर्गुणध्यान, ओवी ५७**

रामदासांच्या प्रपंचविषयक मतांची पहाणी करणे मोठे उद्‌बोधक आहे. त्यांत दिसणाऱ्या वैचारिक परिवर्तनाची मीमांसा अनेक अभ्यासकांनी केलेली आहे. आपल्या पूर्वायुष्यातील लेखनात अन्य संतांप्रमाणेच प्रपंचाविषयी आत्यंतिक विरक्ती व्यक्त करणारे रामदास उत्तरकालात सुखी प्रपंचाची चित्रे रेखाटू लागले, ऐहिक सुख मिळवण्याचा उपदेश करू लागले, आनंदमय अशा रामराज्याचे स्वप्न रंगवू लागले, हे सर्व त्यांच्या समाजाभिमुख दृष्टीचे द्योतक आहे. पारलौकिक कल्याणाचा विचार ऐहिक समाधान व संपन्नता याखेरीज व्यर्थ आहे, अशी क्रांतिकारक भूमिका रामदासांच्या वाङ्मयात, विशेषतः त्यांच्या जीवनाच्या उत्तरार्धात दासबोधात आणि अन्य स्फुट प्रकरणात व्यक्त होऊ लागली. इहवादी भूमिकेचे एक अभिनव दर्शन या लेखनातून प्रकट झालेले दिसते.

**आधी प्रपंच करावा नेटका । मग घ्यावे परमार्थविवेका ।**

दा. १२.१.१

**संसार करावा सुखें यथासांग । स्फुट अभंग, १४८**
**प्रपंचीं ते भाग्य, परमार्थी वैराग्य। दोन्ही यथासांग दोहीकडे ।।**

स्फुट अभंग, २१

'मनासारिखी सुंदरा ते अनन्या' या चरणाने सुरू होणाऱ्या एका प्रकरणात रामदासांनी सर्वांगांनी समृद्ध अशा संसाराचे चित्र रंगविले असून, सर्व प्रापंचिक गोष्टी मनासारख्या लाभणे हा भाग्याचा योग आहे, असे म्हटले आहे. रामदासांच्या या प्रपंचनिष्ठ विचाराचे वेगळेपण मध्ययुगीन वाङ्मयात तरी अपूर्व आहे. जीवनाकडे बघण्याची एक नवी, उत्साहपूर्ण व विजिगीषु दृष्टी समाजाला देण्याचे कार्य आपल्या उत्कट शैलीने रामदासांनी केलेले आहे.

या प्रपंचसम्मुख विचारांचे प्रखर स्वरूप रामदासांच्या राजकारणविषयक स्फुट प्रकरणातून शब्दरूप पावलेले आहे. मुमुक्षू आणि गृहस्थाश्रमी या वर्गाबरोबरच क्षात्रधर्माचा स्वीकार केलेल्या राजकारणी पुरुषांचा मोठा गट रामदासांच्या शिष्यात होता. त्यांना रामदासांनी वेळोवेळी जे मार्गदर्शन केले तसे तत्पूर्वीच्या वाङ्मयातही नव्हते आणि नंतरच्या अगदी रामदासी शिष्यांकडूनही झाले नाही. भक्तिमार्गाची उपासना निश्चितपणे करण्यासाठी पुन्हा धर्मस्थापना झाली पाहिजे आणि त्यासाठी परमार्थाचा कैपक्षी (कैवारी) असा धर्मरक्षक राजा निर्माण झाला पाहिजे हे रामदासांच्या राजकीय विचारांचे आधारसूत्र आहे. या महाराष्ट्राचे आनंदवनभुवन व्हावे असा त्यांना जो निदिध्यास लागलेला होता त्यातून त्यांची राजकीय शिकवण निर्माण झालेली आहे. राजकीय उत्पातांची दखल, त्यांच्या प्रतिकारासंबंधी केलेले चिंतन-मनन आणि तदनुसार शिवाजी-संभाजी यांच्या सारख्या क्षात्रवीरांना केलेले मार्गदर्शन हे रामदासांच्या शिक्षणातील एक अत्यंत तेजस्वी असे प्रकरण आहे. आपल्या वाङ्माधुर्याने लोक एकत्र करावेत, त्यांना संघटनेचा महामंत्र शिकवावा, धर्मस्थापनेच्या विचाराने ते भारून टाकावे आणि या सर्व कार्याला भगवंताच्या अधिष्ठानाची बैठक द्यावी असे जयिष्णू महाराष्ट्रधर्माचे तत्त्वज्ञान रामदासांनी तत्कालीन समाजाला शिकविण्याची धडपड केली. आसुरी संपत्तीचा त्याग करून दैवी गुणसंपदा प्राप्त करून घ्यावी हा दृष्टिकोण पारमार्थिक भूमिकेच्या अंगाने फार पूर्वीपासून चालत आलेला होता. त्याला रामदासांनी ऐहिक दृष्टीची जोड देऊन समाजाने चारही पुरुषार्थांची साधना करणे अवश्य आहे असा, संपूर्ण जीवनाला व्यापणारा विचार समाजाला शिकविला.

**पहिलें तें हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ।**
**तिसरें तें सावधपण । सर्व विषईं । दा. ११.५.४**





अनुक्रमणिका

**चौथा असावा साक्षेप (= प्रयत्न) । दा. ११.५.५**

ही त्यांची सर्व जीवनकार्याला आधारभूत अशी चतु:सूत्री पाहिली म्हणजे रामदासांच्या सर्वस्पर्शी शिकवणुकीची यथार्थ कल्पना येते. अशा प्रकारच्या समग्र जीवनदृष्टीचा सर्वदूर प्रसार होण्यासाठी रामदासांनी देशव्यापी शिष्यसंघटना उभी केली आणि आपल्या विचारांनी प्रशिक्षित केलेल्या अधिकारी शिष्यांची ठिकठिकाणच्या मठांमध्ये नियुक्ती केली. या मठांतून जी प्रचंड हस्तलिखिते विसाव्या शतकातील संशोधकांना उपलब्ध झाली ती पाहिली म्हणजे 'दिसांमाजि काही तरी ते लिहावे । प्रसंगी अखंडित वाचीत जावे' हा रामदासांचा प्रेरकमत्र किती प्रभावी ठरला होता. त्याची कल्पना येते. आपला विचार करणारा शिष्य केवळ पढिक नसावा, तो क्रियावान, समाजशिक्षक असावा अशी रामदासांची भूमिका असल्याने शिष्यांच्या विचार - आचारात एकरूपता असणे आवश्यक आहे असा त्यांनी सतत आग्रह धरिलेला आहे.

**क्रिया शब्दांस अंतरे । तो एक पढतमूर्ख ।। दा. २.१०.९**

**जैसे मुखे ज्ञान बोले । तैशीच सवें क्रिया चाले । दा. १२.४.१३**

**बोलण्यासारिखे चालिणें । स्वयें करूनि बोलणें ।**
**त्याची वचनें प्रमाणें । मानिती जनीं ।। दा. १२.१०.३९**

**क्रियेविण वाचाळता व्यर्थ आहे ।।** मनाचे श्लोक, क्र. ११५

ही रामदासांची वचने त्यांच्या क्रियाशील कार्यकर्त्यांच्या कानांवर पडत आणि त्यातूनच भारतभर पसरलेली शिष्यांची मालिका म्हणजे रामदासी संप्रदायाची प्रबोधन केंद्रेच निर्माण होत. परंपरेने चालत आलेल्या निवृत्तिप्रधान भागवतधर्मातील महत्त्वाची वैशिष्ट्ये रामदासांनी आत्मसात केली आणि त्यांना आपल्या समाजनिरीक्षणांतून जाणवलेल्या नवीन कालानुरूप घटकांची जोड देऊन त्यांनी एक परिपूर्ण जीवनाचे तत्त्वज्ञान त्यावेळच्या समाजासमोर आपल्या सुबोध शैलीने मांडण्याचा प्रयत्न केला. त्यातील काही भाग कालसापेक्ष असला तरी आजच्या जीवनालाही प्रेरणा देणारी प्रबोधशक्ती त्यामध्ये निश्चितपणे सामावलेली आहे. जिज्ञासू विद्यार्थ्याच्या नम्र भूमिकेतून रामदासांची साहित्यसृष्टी अभ्यासणाऱ्या वाचकाला जीवनातील अनेक क्षेत्रांसंबंधी उद्बोधक अशी माहिती तर मिळेलच; पण स्वतःच्या आणि समाजाच्या भविष्यकाळाविषयी आशावाद निर्माण करणारी प्रेरणाही मिळेल.

**शंकरछाया, ३८४/१ शनिवार पेठ, पुणे ४११ ००३०**



# थेंबे थेंबे वृत्तिविकास

**लीला पाटील**

### शिक्षणाचा केंद्रबिंदू कोणता?

शिकायचं म्हणजे काय? या प्रश्नाची अनेक उत्तरं ऐकायला मिळतात. परीक्षा पास होण्यासाठी सरकारमान्य पुस्तकं शिक्षकांकडून ऐकायची, ती लक्षात ठेवायची आणि लक्षात ठेवलेलं परीक्षेत लिहून टाकायचं म्हणजे शिकायचं हे सर्वसामान्य रूढ उत्तर. शिकणाऱ्याला आणि शिकवणाऱ्याला हे उत्तर फार सोयिस्कर वाटतं. मळलेल्या, रेखीव वाटांवरून चालण्यासारखं हे शिकणं बिनत्रासाचं असतं. समजलं का? जे समजण्यासारखं वाटतं ते आजूबाजूच्या वास्तवाच्या निकषावर तपासून बघितलं का? - असल्या प्रश्नांचा शोध मग घ्यावा लागत नाही. परंतु सृजन - आनंद शिक्षण केंद्रात किंवा सृजन - आनंद विद्यालयात काम करताना आमचा विचार 'मुलामुलींना' जगाकडे सजगतेनं पहायला, जे दिसतं त्याचा अर्थ शोधायला आणि जो अर्थ लक्षात येतो त्यावरून सत्यासत्य, योग्यायोग्य ठरवायला समर्थ करणं हाच असतो. शिकण्याचा परिणाम म्हणून त्यांच्या ठिकाणी आत्मनिर्भरता जशी निर्माण व्हायला हवी तशीच स्वतः झीज सोसून इतरांवर प्रेम करण्याची वृत्ती विकसित व्हायला हवी. निर्भय मन आणि उन्नत माथा होणं जसं आवश्यक तसंच दुसऱ्यांना अकारण त्रास देण्याबद्दलचं भय आणि योग्य तिथं विनम्र माथाही असणे जरूर आहे. विचारनिष्ठता म्हणजे विचारकर्कशता नव्हे, याचा प्रत्ययही यायला हवा. व्यक्ती आणि समाज या दुहेरी विणीच्या नात्यांची जाणीव आवश्यक असते. थोडक्यात सांगायचं झालं तर शब्दांना भेदून त्यातल्या अर्थाचा, वास्तवाचा आणि संभाव्यतेचा गाभा हरतऱ्हांनी शिकणाऱ्यांपर्यंत झिरपायला हवा. हे व्हावं असं वाटणं आणि ते तसं होणं यातलं अंतर कमी करण्यासाठी हेतुपूर्वक नाना उपक्रम योजावे लागतात. त्या उपक्रमांपैकी काही दैनंदिन असतात. काही नैमित्तिक असतात. काही सर्वांनी मिळून करायचे तर काही इयत्तावार होतात. काही ताई-दादांनी करून दाखवायचे आणि मुलांनी पहायचे. काही मुलांनी करायचे आणि ताई-दादांनी पहायचे. पण प्रत्येक उपक्रमाचा केंद्रबिंदू मुलाची निकोप वृत्ती हाच असतो.

### पिठलं भाताचा खाऊ

सृजन - आनंद विद्यालयाच्या अगदी पहिल्या वर्षापासून आतापर्यंत आम्ही

शाळेत खाऊ करीत असतो. क्रियापद लक्षात घेतलं ना? 'करीत असतो.' तय्यार खाऊ आम्ही कधीच आणत नाही. तय्यार खाऊ आणला की तो 'माल' असतो. तो तोंडात गेला की संपतो! पण केलेला खाऊ 'माल' नसतो. खाल्ल्यानंतरही कितीतरी दिवस त्याची चव, वास, रूप आपल्या अंतरंगात दरवळत असतं. शाळेत केल्या जाणाऱ्या खाऊचं महत्त्व त्याच्या किंमतीवरून किंवा बाह्य वेष्टनावरून ठरत नाही. आता अगदी पहिल्या वर्षीच्या खाऊचंच उदाहरण घ्या ना! शाळेत आपण काहीतरी खायचा पदार्थ बनवू या असं म्हटल्यावर मुलांना मजा वाटली. शाळेत असलं काही असू शकतं याबद्दलच्या त्यांच्या पूर्वकल्पनांना छेद बसला. मग चर्चा सुरू झाली, काय करायचं याची. पहिलीतली ती मुलं स्वतःला आवडणारा एकेक पदार्थ सांगू लागली. गुलाबजाम, जिलबी, लाडू. मी जेव्हा 'भात - पिठलं' हा खाऊ सुचवला तेव्हा बऱ्याच मुलांनी "शीः तो कसला खाऊ!" असंही म्हटलं. नंतर बऱ्याच चर्चेनंतर भात-पिठल्यावर शिक्कामोर्तब झालं. आमच्या घरचे जिरेसाळ तांदूळ आणि तूप मी नेलं होतं. बाकीचे सारे पदार्थही शाळेत आणले होते. तांदूळ निवडणं, धुणं, स्टोव्ह पेटविणं, मोठ्या पातेल्यात भातासाठी पाणी ठेवणं, तांदूळ वैरणं, रटारटा शिजविणं..... हे सारं मुलं करत होती, त्याबद्दल बोलत होती, बोललेलं ऐकत होती. जिरेसाळ तांदूळ शिजतानाचा घमघमाट अनुभवत होती. कांदा चिरताना डोळ्यांना पाणी येतं, हात कापतो, कोथिंबीर बारीक चिरणं अवघड असतं अशा साऱ्याचा प्रत्यय घेत होती. फक्त भात - पिठलं करताना इतकं सारं करावं लागतं तर ताटभर वाढले जाणारे विविध पदार्थ करणाऱ्या आईला किती त्रास होत असेल, असा विचार त्यांच्या मनांना चाटून जात होता. बोट कापल्यावर ताईंनी औषध लावून पट्टी बांधली; आई मात्र गडबडीत कापलेलं बोट नळाखाली धरून पुनः कामाला लागते, अशी तुलना कुठेतरी डोकावत होती. शाळेतल्या ताई जशा सारी कामं पुढे होऊन करत आहेत तसंच दादाही झाडणं, चिरणं, घासणं, वाढणं अशा कोणत्याच कामात मागे नाहीत हे पाहून नकळत आई- ताई काम करताना पेपर वाचत बसणारे बाबा डोळ्यांपुढे येत होते. कितीतरी नामं, विशेषणं, क्रियाविशेषणं आणि क्रियापदं मुलं त्या दिवशी खऱ्या अर्थी शिकली. भात-पिठले हा सुद्धा एक उत्तम खाऊ आहे अशा वृत्तीचा एक पातळ पापुद्रा त्यांच्या मनावर तयार झाला. एकत्रित, सगळ्यांनी मिळून काम करण्यात मजा असते याचा अनुभव त्यांनी घेतला. मुलगे आणि मुली किंवा दादा आणि ताई यांच्या कामाची वाटणी लिंगभेदावर आधारित नाही हे त्यांना जाणवत होतं. विकत आणलेला खाऊ खाऊन टाकण्यापेक्षा साधासा, कमी खर्चाचा खाऊ शाळेत तयार करता करता आपण कविता करतो, चित्रं काढतो, पदार्थांच्या नावाच्या याद्या लिहितो. ...... आणि या

साऱ्याची खूपच मजा वाटते हे मुलांच्या अंतरंगापर्यंत पोचत होतं. त्या वर्षानंतर आजवर आम्ही दरवर्षी निदान दोनदा तरी शाळेत खाऊ करतच असतो. खाऊ करायचं ठरवताना त्यात कोणकोणत्या प्रक्रिया अंतर्भूत आहेत, मुलांना किती प्रकारचे अनुभव त्यातून मिळतील; आहार, आचार, विचार याबद्दलचे कोणते अपसमज खाऊ करता करता दूर होऊ शकतील असा विचार प्रामुख्यानं केला जातो.

**सबल मानसिकतेसाठी**

शाळेत करायची कोणतीही बाब ही अत्यंत विचारपूर्वक योजावी लागते. 'काय केलं' यापेक्षा ते 'कसं साकारलं' याला महत्त्व असतं. निरोप समारंभासारखी नेहमीच शाळेत घडणारी घटना उदाहरणादाखल घ्या. शाळेतून बाहेर पडणाऱ्या मुलांसाठी निरोप समारंभ करायचा हा नेहमीचाच रिवाज. सृजन - आनंद विद्यालयात हा केवळ रिवाज नाही, त्याचाही उपयोग मुलांनी आणि ताई दादांनी शिकण्या-शिकवण्यासाठी कसा होऊ शकेल याचा शोध घेतला जातो. प्रत्येक वेळी हाती यशच लागतं असं नाही; पण प्रायोगिक कामात 'अमुक वाटेनं गेल्यास गोंधळ होतो / मनापुढे असलेले हेतू साध्य होत नाहीत.' हे समजणं ही सुद्धा प्रायोगिक कामाची एक महत्त्वाची फलनिष्पत्तीच असते. एका वर्षी आम्ही असा विचार केला की, निरोप समारंभ म्हणजे प्रेमभावनेची उत्कट देवाण- घेवाण. इयत्ता चौथीतला जो कुणी विद्यार्थी पहिली ते तिसरीपर्यंतच्या विद्यार्थ्याला आवडतो त्याच्यासाठी त्यानं भेटवस्तू करावी. मनसुबा खूप छान. पण घडलं काय? खूपसा गोंधळ! शिवाय, चौथीच्या ज्या वर्गताई बोलायला उभ्या राहिल्या त्यांना रडू अनावर झालं, त्यांचा चेहरा भावनांनी ताणला. आवाज बाहेर पडेना. हे सारे पाहताना काही मुलं हसत होती तर काहींना वाईट वाटत होतं. 'प्रौढत्वी निज शैशवास जपणे' या न्यायाने ताईंचं हे वागणं ठीक असलं तरी भावनांना विवेकाचा लगाम कसा घालावा याचा वस्तुपाठ मुलांना दिसला असता तर त्यांच्या भावी जीवनाच्या दृष्टीने ते बरं झालं असतं असं आम्हाला वाटलं. चौथीच्या मुलांना त्या दिवशी आपण कोणीतरी मोठे आहोत असं एकीकडे वाटत असतं; तर दुसरीकडे सृजन - आनंद विद्यालय सोडताना त्यांच्या जिवावर आलेलं असतं. आणखी एका वर्षी निरोप समारंभाच्या वेळी आम्ही विचार केला की, दुसऱ्या शाळेत जाण्यासाठी जी मानसिकता - फार प्रश्न न विचारणं, मोठ्या वयाच्या माणसांना / शिक्षकांना उलट न बोलणं, शाळेत पट्टी बसली तर ती सोसून घेणं, गृहपाठाचा कंटाळा न करणं, शिक्षकाच्या शरीराला जवळ जाऊन हात न लावणं आवश्यक आहे, तीच एका वेगळ्या प्रकारानं

मुलांपर्यंत संक्रमित करावी. त्यासाठी वनस्पतिशास्त्रात तज्ज्ञ असलेल्या एक प्राध्यापक ताई आम्ही निवडल्या. भोवतालच्या परिस्थितीत 'टिकून' राहण्यासाठी वनस्पती स्वतःच्या शरीरात कसे बदल करतात हे अनेक वनस्पती प्रत्यक्ष दाखवून त्यांनी वर्णन केलं. आम्हांला जे अपेक्षित होतं ते सूचित झालं असलं तरी तात्पर्याचा गोळा काढून मुलांच्या हाती आम्ही मुद्दामच दिला नाही. विविध व्यक्ती आणि संस्था यांच्यातलं भलंबुरं स्वतःच जाणून घेऊन आपल्या विकासाच्या वाटेवर त्यांचा कमी-अधिक उपयोग कसा करून घेता येईल याबद्दल मुलांना उपदेशाचे डोस पाजणं, इतर शाळांची निर्भर्त्सना करत आपली शाळा कशी चांगली आहे हे त्यांच्या मनावर बिंबवावं असलं काही आम्हांला करायचं नव्हतं. मुले चौथीत आली की, अधूनमधून श्रुतलेखन, चर्चा, मुलांचं लेखन अशी निमित्तं साधून आम्ही दुसऱ्या शाळेत जाण्यासाठी त्यांची मानसिकता तयार करण्याच्या प्रयत्नांत असतोच. विविध चर्वींनी अन्नाचं परब्रह्म होतं. जीवनपटही विविध प्रकारच्या व्यक्ती, घटना, संस्था यांच्या उभ्या आडव्या धाग्यांनी बनलेला असतो. विकासाचा एक टप्पा जितक्या सहज रीतीनी मुलं ओलांडतील तितक्या सहजतेनं भावी जीवनातील चढ-उतारांकडे ती पाहू शकतील असं आम्हां साऱ्यांना वाटतं. एकाच मापानं साऱ्या व्यक्ती किंवा संस्था न मोजता स्वतःच्या विकासासाठी हंसक्षीरन्यायानं आवश्यक ते स्वीकारणं आणि नकोशा वाटणाऱ्या बाबी काही काळ सोसणं किंवा त्यांचा त्याग करणं आवश्यकच असतं ना?

**स्नेहसंमेलन : मेंदू, मन आणि मनगट**

शाळेच्या वर्षभराचं जे ऋतुचक्र सामान्यपणे असतं त्यात स्नेहसंमेलन हा ऋतू असतोच. सृजन - आनंद विद्यालयही याला अपवाद नाही. वर्षभरातले साधारणपणाने पंधरा ते वीस दिवस विद्यालयात स्नेहसंमेलनाचे वारे घुमत असतात. प्रदर्शन, विविध कार्यक्रम, पाहुण्यांना द्यायच्या भेटवस्तू यांच्या तयारीत मुलं व ताईदादा रंगलेले असतात. मात्र इथेही चकचकीतपणा, गुळगुळीतपणा आणि बिनचूकपणा यांवर विद्यालयाचा भर नसतो. मुलांतील आत्मविश्वास जागृत करणं, त्यांना आत्मसन्मानाचा अनमोल प्रत्यय मिळणं, त्यांच्यातील सृजनशीलतेच्या आविष्काराला नव्या वाटा मिळवून देणं आणि एकंदरीतच सादर होणाऱ्या कार्यक्रमांकडे फलित (product) म्हणून न पाहता त्यांच्याकडे क्रिया (process) म्हणून पाहणं असा आमचा प्रयत्न असतो. यामुळं काय होतं? कोणीतरी लिहिलेलं नाटक मुलं पाठ करत नाहीत. वर्षभरात शिकलेले धडे, केलेले प्रकल्प, म्हटलेली गाणी, ऐकलेल्या गोष्टी, केलेले प्रयोग या साऱ्यांपैकी जे फार आवडलं त्यावर

कार्यक्रम करायचा ठरतो. 'आभाळाचा निरोप' सारखा धडा नाटकरूपानं सादर करताना धड्यात नसलेल्या कितीतरी आशयाची भर मुलं घालतात. धड्यात न आलेली नवी पात्रं त्यांच्या नाटकात येतात. ती पात्रं काय बोलतील याचा विचार मुलंच करतात. कोणत्या पात्राचं काम कोणाकडे द्यावं याच्याही चर्चा होतात. नाटकाला संहिताच नसल्यानं ती पाठ करण्याचा प्रश्नच नसतो! त्यामुळे कार्यक्रम सादर करताना कोणाचं काही चुकलं तर इतर मुलं गोष्टीतले संदर्भ लक्षात घेऊनं जोडाजोड करतात. स्नेहसंमेलनासाठी कोणी नवीन ड्रेस विकत आणायचे नसतात. नेहमीच्या गणवेशातच मुलं रंगमंचावर असतात; मात्र विविधरंगी कागदांचा उपयोग करून 'नटण्याचं' त्यांना आवाहन असतं. अशाप्रकारे नटताना मुलांबरोबर पालकही त्यात सामील होतात. 'तय्यार' ड्रेस आणताना पालकाचा 'खिसा' रिकामा होतो! कागदाचा ड्रेस किंवा अलंकार करताना मुलं आणि पालक यांची मनं सर्जनशीलतेच्या आनंदानी भरून जातात! पात्रांचं स्वरूप लक्षात घेऊन किती मेहनतीनं व किती सुंदर वेषभूषा आणि अलंकार तयार केले जातात!

शाळेतल्या जवळजवळ सर्वच मुलामुलींना रंगमंचावर येण्याची संधी मिळायला हवी याबद्दल ताईदादा प्रयत्नशील असतात. प्रख्यात अभिनेत्री स्मिता पाटील यांनी एका समारंभात सांगितलं होतं की, त्या सावळ्या होत्या म्हणून त्यांना स्नेहसंमेलनाच्या कार्यक्रमात घेतलं नव्हतं. स्मिताचं हे वाक्य माझ्या मनात रुतलं आहे. रंग, उंची, बांधा अशा शारीरिक किंवा जातपात, धर्म, लिंग यासारख्या सामाजिक भेदांमुळे मनोरंजन कार्यक्रमात मुलाला न घेण्याची चूक आपल्या हातून घडू नये याबद्दल आम्ही दक्ष असतो. विद्यार्थ्याची श्रेष्ठता केवळ परीक्षेतल्या मार्कांनी ठरत नाही, असंही मुलांना आणि पालकांना आम्हाला सूचित करायचं असतं. त्यामुळेच मग ज्या सुहासचं वैशिष्ट्य म्हणजे सहजतेने घोड्याचे सुंदर चित्र काढणं तो सुहास रंगमंचावर ठेवलेल्या फलकावर ऐटदार घोडा काढतो असाही एक कार्यक्रम सादर होतो. शिवाय 'छानछान' सारखा कार्यक्रमही त्यांसाठीच होतो. बौद्धिक, भावनिक आणि क्रियात्मक बाबतीत कोणत्या मुलाचं काय छान आहे याची इयत्तावार यादी करून ती वाचली जाते आणि संबंधित मूल ताठपणानं क्षणभर रंगमंचावर उभं राहतं. माणसामाणसातील ज्येष्ठ - कनिष्ठतेच्या भिंतीही ढासळण्याचा आमचा जाणीवपूर्वक प्रयत्न असतो. त्यामुळेच मग शाळेच्या वर्षभराच्या कामाचा अहवाल कोणी डुढ्ढाचार्य ताई किंवा दादा न वाचता आमच्या शालीन व शहाण्या सेविका विजयाताई वाचतात. आमचे हे प्रयत्न फार तोकडे आहेत. आजूबाजूचे दिखाऊ पण चामट वास्तव तोडण्याची त्या प्रयत्नांत शक्ती नाही हे आम्हांला पूर्णपणे माहीत आहे. सृजन-आनंद विद्यालयात मुलांच्या आणि ताई- दादांच्या

वृत्तिविकासाचे प्रयत्न जारीच असतात; त्यामुळेच रंगमंचावर आपण कधी उभ्या राहू असं ज्यांना वाटलं नसेल, अशा वासंतीताई व वसुधाताई आत्मविश्वासानं आपली भूमिका पार पाडतात; तेव्हा त्यांना स्वतःला मिळणारा आत्मसन्मान व आत्मविश्वास अमोल असतो. विद्यालयात काम करू लागल्यापासून निमाताई कवितांच्या बाबतीत 'बहुप्रसवा' झाल्या आहेत. याचंही कारण आव्हानं अंगावर घ्यायला शिकवणारं सृजन - आनंद विद्यालय हे आहे. शाळेच्या कामाचं नियोजन करता करता आशाताई, रोहिणीताई, सुचिताताई यांच्यासारख्या ताई 'अव्वल नियोजक' बनल्या आहेत. स्वतःत सुप्त रूपानं असलेलं हस्तकला - कौशल्य आता ज्यांचं वैशिष्ट्य झालं आहे त्या नंदिताताईंनाही विद्यालयाच्या विविध कामांतूनच ते प्राप्त झालं आहे. श्रेष्ठाश्रेष्ठतेच्या संकल्पनांनी बांधलेली माणसं एकतर अहंकारानं फुगलेली असतात, किंवा आत्मसन्मान भावनेच्या अभावी दबलेली असतात. असं होता कामा नये याबद्दल विद्यालयाचा कटाक्ष असतो. स्नेहसंमेलनाच्या सर्व कार्यक्रमाचं सूत्रसंचालन मुलं करतात आणि पाहुण्यांच्या जोडीनं रंगमंचावर ऐटीत खुर्चीत बसतात. इतक्या लहान वयात अशी महत्त्वाची जबाबदारी मुलं पेलू शकतील का? अशी शंका ज्या लोकांना वाटते त्या लोकांनी सृजन - आनंद विद्यालयाचं स्नेहसंमेलन पहावं ! स्नेहसंमेलन हे अध्ययन - अध्यापनासाठी एक निमित्त आहे आणि शिकण्या - शिकवण्याचे केंद्रबिंदू मेंदूबरोबर मन आणि मनगट हेही आहेत याचे विस्मरण आम्ही होऊ देत नाही.

**मूल्यशिक्षण आणि अध्यापन**

मूल्यशिक्षणाच्या प्रयत्नांतून वृत्तिविकास होतो. मूल्यशिक्षण अशी वेगळी तासिका असल्याशिवाय वृत्तिविकासाला खत-पाणी मिळणार नाही, असं निदान आम्हाला तरी वाटत नाही. शाळेच्या अगदी पहिल्या-दुसऱ्या वर्षी स्मिताताईंनी गोष्ट सांगताना "मुंगी कसा पोपटाचा मित्र असू शकेल?" असा प्रश्न मुलांनी विचारला होता. प्रश्नाचा दुवा साधून स्मिताताईंनी वर्ण, धर्म, जात, लिंग, किंवा श्रीमंती - गरिबी मैत्रीला अटकाव करू शकत नाही हे स्पष्ट केलं होतं. मुलांचं काम पाहण्यासाठी वर्गातून फिरताना एकदा एका मुलाला ताईंचा पाय लागला. ताई म्हणाल्या, "सॉरी हं." मुलगा म्हणाला, "लहान मुलाला कसलं सॉरी म्हणायचं." ताई म्हणाल्या, "अरे, लहान मूल सुद्धा माणूसच असतं. मोठ्या माणसाची चूक झाली तर लहान मुलालाही त्यानं सॉरी म्हणायला पाहिजे." अगदी परवापरवाचं आणखी एक उदाहरण अगदी बोलकं आहे. रेखाताई गणित शिकवत होत्या. जमाखर्चाचं एक गणित होतं. जमेच्या बाजूच्या आकड्यांत बाबांचा आणि आईचा

पगार लिहिलेला होता. आईच्या पगाराचा आकडा बाबांच्या पगारापेक्षा जास्त होता. केवळ आकडेमोड म्हणजे गणित नव्हे, हे समजलेल्या सृजन - आनंद विद्यालयातल्या मुलांनी गणित वाचल्यावर त्याचा अन्वयार्थ लावला, आणि रेखाताईंना विचारलं, "आईचा पगार बाबांपेक्षा कसा जास्त असेल?" अहितकारक वृत्तीला छेद देण्याचा रेखाताईंचा हेतू सफल झाला. आईबाबांचं शिक्षण, त्यांची कार्यक्षमता यांवर त्यांचे पगार अवलंबून असतात आणि त्यामुळेच आईचा पगार जास्त असू शकतो अशा स्पष्टीकरणानंतर आपोआपच परस्परांत बोलताना मुलं घरातल्या कामाची वाटणीसुद्धा स्त्री की पुरुष यावर न ठरता कोणाला कोणती कामं करायला किती वेळ आहे यावर ठरावी असं बोलत होती. मूल्यशिक्षणासाठी विषय, आशय, स्थल, काल अशा मर्यादा नसतात. जीवनातल्या अणुरेणूंत मूल्यविकासासाठी सुयोग्य संधी सुप्तावस्थेत असतात. घटना, प्रसंग, किंवा अध्ययन विषय यांची शाब्दिक फोलपटं दूर केल्यावरच मूल्यांचा रसरशीत दाणा हाती लागतो. मूल्यांचं दर्शन व स्पर्श अनेकवेळा होत होत त्याबद्दलची समजूत सखोल होत जाते व वृत्तिविकास होतो.

"माझ्या विकासाच्या आड शिक्षण आलं" असं सुप्रसिद्ध आंग्ल लेखक बर्नर्ड शॉ यांनी एके ठिकाणी म्हटलं आहे. मागरिट मीड यांच्या आजीनंही त्यांचं शिक्षण व्हावं म्हणून त्यांना शाळेपासून दूर ठेवण्याचा प्रयत्न केला. निष्प्राण माहितीची चिलखतं अंगावर चढवून केवळ 'जिवंत रहायचं' असेल तर त्यासाठी मिळवलेल्या पदव्यांची श्रेणी, पगाराचे आकडे आणि बँकेतल्या ठेवी अशा बाबी पुरेशा ठरतील; परंतु वृत्तिविकास हा केंद्रबिंदू मानून शिक्षण देणाऱ्या आणि घेणाऱ्या व्यक्तींना केवळ 'जिवंत' राहण्यापेक्षा 'जगणं' महत्त्वाचं वाटतं. सार्थ जगण्यासाठी वृत्तिविकास आवश्यक असतो. वृत्तिविकास रंगाचे पट्टे ओढल्यासारखा भराभरा होत नाही. आंतपर्यंत रुजून वृत्तीचे रंग शरीर - मनाच्या सर्व व्यापारांवर पसरत जातात; थेंबाथेंबानी ते साकारतात. म्हणूनच विकासाचे सौंदर्य पहायचं असेल तर 'थेंबे थेंबे तळे साचे' यावर विश्वास ठेवायला हवा.

**१७, सौरभ, रुईकर वसाहत, कोल्हापूर ४१६ ००५**







अनुक्रमणिका

# येशूची लोकशिक्षणाची शैली

फ्रान्सिस दिब्रिटो

जें आपणासी ठावें । ते इतरासी सिकवावें । शहाणे करूनि सोडावें । सकल जनां ।। असा सर्व प्रवचनकारांचा निर्धार असतो. आपल्याला पटलेली भूमिका इतरांना समजावून देणे आवश्यक असते. आज त्यासाठी दूरदर्शन, आकाशवाणी, वृत्तपत्रे आणि जाहिरात तंत्र अशी प्रभावी साधने उपलब्ध आहेत. दूरसंचार यंत्रणेमुळे संपर्क सुकर झालेला आहे. परंतु या साधनांचा अभाव होता त्याकाळी लोकसंपर्क हेच प्रबोधनाचे एकमेव साधन होते.

**लोकसंपर्क**

येशूख्रिस्ताचे आयुष्य तेहतीस वर्षांचे. त्यातली तीस वर्षे त्याने एकांतात घालविली. अखेरच्या तीन वर्षात त्याने स्वतःला लोकांतात झोकून दिले. भूमध्य सागराला लागून असलेला दक्षिणोत्तर गालिली प्रांत ही त्याची कर्मभूमी. सुमारे हजार दिवसांच्या अवधीत ख्रिस्ताने हा सर्व विभाग पिंजून काढला. बहुतेक प्रवास पायीच व्हायचा. क्वचित गाढवाचा किंवा घोड्याचा वापर केला जात असे.

"सर्वस्वी सर्वांसाठी" हे ख्रिस्ताच्या जीवनाचे ध्येय होते. समाजातील प्रत्येक माणसाला भिडणे हा त्याचा पुढील कार्यक्रम होता. त्याने मंदिराच्या पीठावरून प्रवचने केली, त्याचप्रमाणे गल्लीबोळात आणि शेताशिवारात हिंडून लोकांना शिकविले. त्याच्या श्रोतृवर्गात कायद्याचा कीस काढणारे धर्मपंडित होते, तसेच अक्षराची ओळखदेख नसलेले अशिक्षित कोळी, माळी होते. त्याला सापळ्यात पकडण्यासाठी टपलेले विरोधक होते, त्याचप्रमाणे त्याचा शब्दन्‌शब्द झेलणारे श्रवणभक्त होते.

ख्रिस्ताची प्रवचने ऐकण्यासाठी लोकांच्या झुंडीच्या झुंडी लोटत असत. कधी इतकी रेटारेटी व्हायची की तो पडावात उभा राहून किनाऱ्यावरील लोकांना उपदेश करीत असे. त्याच्या शब्दाला अधिकारवाणीची धार होती. त्यामुळे सर्वांवर त्याची छाप पडत असे. प्रवचनात तो दृष्टांतकथांचा (पॅरबल) मुक्तपणे वापर करीत असे.

**दृष्टांतकथा**

गोष्ट किंवा रूपक सांगून श्रोत्यांना उत्तर शोधायला लावणे हा दृष्टांतकथांचा

मुख्य हेतू असतो. अशा गोष्टी ऐकायला खूपच रोचक आणि रंजक असतात. दृष्टांतकथा वरवर पाहता साध्यासोप्या वाटतात, लहानांना त्या ऐकायला आवडतात, मोठ्यांचे लक्ष त्या वेधून घेतात. त्या छोट्यांची करमणूक करतात; परंतु थोरांना मात्र त्या विचार प्रवृत्त करतात. साध्या विषयातही आशय असे महान, असे त्यांचे स्वरूप असते. दृष्टांतकथा मार्मिक आणि अर्थघन असतात. त्या ऐकणाऱ्याला अंतर्मुख करतात. त्यांचा आपल्या जीवनाशी कुठे संबंध जुळतो का याचा तो विचार करू लागतो. थोडक्यात, दृष्टांतकथा म्हणजे एक आरसा आहे. त्यात श्रोता आपले रूप पाहू शकतो.

दृष्टांतकथांचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे त्यात उपदेशाची तीक्ष्ण धार नसते, त्यात दोषारोप नसतो, आग्रह किंवा निग्रह नसतो. कथा सांगून झाल्यावर ख्रिस्ताचे एक पालुपद असायचे : ''ज्याला कान आहेत त्याने ऐकावे'' (मार्काचे शुभवर्तमान ४ :९) माणसाच्या मनाला मोरपिसाने हळूवार स्पर्श करावा अशी ख्रिस्ताची शैली होती. जबरदस्ती करणे त्याच्या गणितात बसत नसे. त्यामुळे कथा सांगून झाल्यावर त्याचे तात्पर्य तो श्रोत्यांवर सोपवीत असे.

ख्रिस्ताच्या श्रोतृवर्गात शेतकऱ्यांचा फार मोठा भरणा होता. त्यामुळे त्यांच्या जीवनातील आणि अनुभवविश्वातील गोष्टींचा वापर त्याने दृष्टांत कथांमध्ये केलेला आढळतो. त्या दृष्टीने हा 'बी पेरणाऱ्यांचा दृष्टांत' पहावा. (लूकाचे शुभवर्तमान ८: ५-८)

''पाहा, पेरणारा पेरणी करावयास निघाला आणि तो पेरीत असताना काही बी वाटेवर पडले व पाखरांनी येऊन ते खाऊन टाकले. काही खडकाळीवर पडले, तेथे त्यास फारशी माती नव्हती. आणि माती खोल नसल्यामुळे ते लवकर उगवले आणि सूर्य वर आला तेव्हा ते करपले व त्यास मूळ नव्हते म्हणून ते वाळून गेले. काही काटेरी झाडामध्ये पडले, मग काटेरी झाडांनी वाढून त्याची वाढ खुंटविली. काही चांगल्या जमिनीत पडले, मग त्याचे कोठे शंभरपट, कोठे साठपट तर कोठे तीसपट असे पीक आले. ज्याला कान आहेत तो ऐको.'' (मराठी अनुवाद मुख्यतः पुढील पुस्तकातून घेतले आहेत - **पवित्रशास्त्र जुना व नवा करार,** बेंगळूर : बायबल सोसायटी ऑव्ह इंडिया, १९७५)

सज्जन मनुष्य सद्विचाराच्या बीजाची पेरणी करीत असतो. परंतु दाणा चांगला असून भागत नाही. जमीनही सकस असावी लागते. मनाच्या भूमीत सद्विचारांची पेरणी सतत होत असते. जो तो आपल्या कुवतीप्रमाणे कमीजास्त फळ देत असतो.

समाजात सुष्ट आणि दुष्ट प्रवृत्तीची माणसे आढळतात. सत् आणि असत्

यांची सरमिसळ झालेली असते. ही वस्तुस्थिती आहे. ती बदलणे अनेकदा आपल्या हातात नसते. अशावेळी अंगी सोशीकपणा असणे आवश्यक आहे. त्या संदर्भात ख्रिस्ताने सांगितलेला गहू आणि निंदण हा दृष्टांत पहावा.

"कोणा एका मनुष्याने आपल्या शेतात चांगले बी पेरले त्याच्यासारखे स्वर्गाचे राज्य आहे. लोक झोपेत असताना त्याचा वैरी येऊन गव्हामध्ये निंदण पेरून गेला; पण जेव्हा पाला फुटला व दाणे आले तेव्हा निंदणही दिसले. तेव्हा घरधन्याच्या दासांनी येऊन त्याला म्हटले, महाराज, आपण आपल्या शेतामध्ये चांगले बी पेरले ना? तर मग त्यात निंदण कोठून आले? तो त्यांना म्हणाला, हे काम कोणा वैऱ्याचे आहे.

दासांनी त्याला म्हटले, तर आम्ही जाऊन ते जमा करावे अशी आपली इच्छा आहे काय? तो म्हणाला, नाही. तुम्ही निंदण गोळा करिताना त्याबरोबर कदाचित गहूही उपटाल. कापणीपर्यंत दोन्ही बरोबर वाढू द्या, मग कापणीच्या वेळेस मी कापणाऱ्यास सांगेन की, पहिल्याने निंदण गोळा करा व जाळण्यासाठी त्याच्या पेंढ्या बांधा. परंतु गहू माझ्या कोठारात साठवा." (मत्तयाचे शुभवर्तमान १३ : २४-३०)

माणूस हे एक विचित्र मिश्रण आहे. त्याच्या अंगी चांगल्या आणि वाईट दोन्ही प्रवृत्ती आहेत. चांगल्याकडे लक्ष केंद्रित करून, वाईटाकडे कानाडोळा करणेच आपल्या हाती असते. ज्याच्या त्याच्या कृतीचा परिणाम ज्याला त्याला भोगावा लागतो; हा संदेश या दृष्टांतकथेतून मिळतो.

ईश्वरी राज्य किंवा स्वर्गाचे राज्य ही संकल्पना ख्रिस्ताने मांडली. संप्रदायाच्या पलीकडे जाऊन, सर्व सज्जनांचा समावेश ज्यात आहे ते देवाचे राज्य; अशी या संकल्पनेची व्याप्ती आहे. या राज्याविषयी बोलताना ख्रिस्त म्हणतो, "देवाचे राज्य कशासारखे आहे? मी त्याला कशाची उपमा देऊ? ते मोहरीच्या दाण्यासारखे आहे. तो एका मनुष्याने घेऊन आपल्या शेतात पेरला, मग तो वाढून त्याचे झाड झाले आणि आकाशातील पाखरे त्याच्या फांद्यांत राहू लागली." (मार्क ४ : ३० - ३२)

हजार मैलांच्या प्रवासाचा प्रारंभ एका पावलाने होत असतो. देवाचे राज्य तसेच आहे. त्याची सुरुवात मर्यादित असली तरी हळूहळू विस्तार वाढत जातो. छोट्या प्रमाणात का होईना, चांगल्या कार्याचा आरंभ होणे जरुरीचे असते.

**कथेचे माध्यम**

सर्व काळातील आणि सर्व संस्कृतीतील लोकांना कथेचे आकर्षण वाटत

आले आहे. सानापासून थोरापर्यंत सर्वांनाच कथा मोहिनी घालते. ख्रिस्ताने आपल्या प्रवचनात कथांचा परिणामकारक वापर केला. उधळा पुत्र (द प्रॉडिगल सन) ही नव्या करारातील एक गाजलेली जगप्रसिद्ध कथा मानली जाते.

परमेश्वर मानवावर निरतिशय प्रेम करतो. माणूस कितीही चुकला, परंतु जर त्याला उपरती झाली तर एखाद्या प्रेमळ पित्याप्रमाणे करुणानिधी परमेश्वर पश्चात्तापी पाप्याला कवेत घेतो आणि त्याला सुधारण्याची संधी देतो; असा संदेश ''उधळा पुत्र'' ह्या कथेतून ख्रिस्ताने दिला आहे. कथेचे सूत्र असे (लूक १५ : ११-३२ वरून) :

एका श्रीमंत वडिलांचे दोन पुत्र होते. धाकट्याने वडिलांकडून आपल्या मालमत्तेचा हिस्सा घेतला व तो परगावी निघून गेला. तिथे त्याने मौजमजेत सर्व संपत्तीची विल्हेवाट लावली. त्याची अन्नान्न दशा झाली. पश्चातापदग्ध होऊन, खाली मान घालून, तो घराच्या दिशेने निघाला. त्याचे दुरून दर्शन घडताच, त्याच्या वृद्ध पित्याने धावत जाऊन त्याचे आगत-स्वागत केले आणि त्याला सन्मानाने घरात घेतले. वडिलांचे हे कृत्य मोठ्या भावाला पसंत पडले नाही. उधळ्या पुत्राला वडिलांनी पुन्हा घरात घेतले म्हणून त्याचा क्रोध भडकला. तेव्हा त्याची समजूत काढीत बाप थोरल्या मुलाला म्हणाला, ''हा तुझा भाऊ मरण पावला होता, तो जिवंत झाला आहे. हरवला होता तो सापडला आहे.''

ख्रिस्ताने तळागाळातील लोकांची नेहमी बाजू घेतली. त्यांच्या हिताकडे अधिक लक्ष पुरविले. सामाजिक शोषणाचा धिक्कार केला.

या संदर्भात ख्रिस्ताने ''श्रीमंत मनुष्य आणि लाजरस'' ही कथा सांगितली. ख्यालीखुशाली करणारा धनवान माणूस सामाजिक पापाचा धनी होतो आणि अन्यायाचा बळी ठरलेल्या भुकेकंगालाला एक दिवस न्याय मिळतो, असे त्या कथेचे सूत्र आहे. (लूक १६ : १९- २५)

खरा शेजारी कोण हे स्पष्ट करताना ख्रिस्ताने भला शोमरोनी (द गुड सामारितन) ही कथा सांगितली. (लूक १० : ३०-३७) तसेच, धनलोभातून विनाश कसा होतो हे 'श्रीमंत मूर्ख' या कथेतून त्याने पटवून दिले. (लूक १२ : १५-२०) 'दक्ष तो मोक्ष साधी' हे सांगताना त्याने दहा कुमारिकांची गोष्ट सांगितली. (मत्तय २५ : १-१२)

एकूण, ख्रिस्ताने कथा आणि गोष्टी या माध्यमाचा अतिशय उत्कृष्टपणे वापर केलेला दिसून येतो.





अनुक्रमणिका

**प्राण्यांच्या कथा आणि दृष्टांत**

धनगर उघड्या माळरानावर शेळ्यामेंढ्या चरण्यासाठी घेऊन जातो. त्यातील एखादे कधी बहकते किंवा एकटे पडते. सदाचाराच्या वाटेवरून माणूसही कळत न कळत अनीतीच्या आडवाटेला जातो. परंतु परमेश्वराला त्याच्या हिताची काळजी असते, हे सूत्र समजावून देण्यासाठी ख्रिस्ताने बहकलेल्या मेंढराची गोष्ट सांगितली.

"एखाद्याजवळ शंभर मेंढरे असली आणि त्याच्यापैकी एखादे जरी बहकून कळपाबाहेर गेले तर बाकीची नव्याण्णव रानात सोडून ते हरवलेले मेंढरू सापडेपर्यंत तो माणूस शोधाशोध करतो. ते सापडल्यावर तो ते आनंदाने खांद्यावर घेतो. घरी येऊन मित्रास आणि शेजाऱ्यास सांगतो, "माझे हरवलेले मेंढरू सापडले आहे म्हणून माझ्याबरोबर आनंदोत्सव साजरा करा."

यानंतर ख्रिस्त सूत्र सांगतो, "ज्यांना पश्चात्ताप करण्याची गरज नाही अशा नव्याण्णव नीतिमानांमुळे होणाऱ्या आनंदापेक्षा अनुताप झालेल्या एका पापी माणसामुळे स्वर्गात विशेष आनंद होतो." (लूक १५ : १-७)

कालांतराने येशूने स्वतःलाच मेंढपाळाची उपमा लागू केली. आध्यात्मिक क्षेत्रात दोन् प्रकारचे गुरू असतात : लुच्चे आणि सच्चे. आपण जनतेची काळजी वाहणारे सच्चे गुरू आहोत हे सांगताना ख्रिस्त म्हणाला, "मी उत्तम मेंढपाळ आहे. उत्तम मेंढपाळ आपल्या मेंढराकरिता प्राण देतो. जो स्वतः मेंढपाळ नाही असा माणूस लांडगा येत असताना पाहून पळून जातो आणि लांडगा मेंढराची शिकार करतो. भाडोत्री तो भाडोत्री. त्याला कसली मेंढरांची कदर! मी माझ्या मेंढराकरिता प्राण देतो." (योहानाचे शुभवर्तमान १० : ११ - १३)

शेवटच्या न्यायदानाच्या दिवशी सज्जन आणि दुर्जन अशी साऱ्या मानव जातीची विभागणी होईल हे सूत्र स्पष्ट करताना ख्रिस्त म्हणाला, "मेंढपाळ जसा मेंढरांना शेरडांपासून अलग करतो त्याप्रमाणे परमेश्वर सज्जनांना दुर्जनांपासून अलग करील." (मत्तय २५ : ३२)

शब्बाथ म्हणजे पवित्र दिवस. त्या दिवशी कुठलेही काम करायचे नाही असा यहुदी लोकांमध्ये प्रघात होता. एका शब्बाथच्या दिवशी येशूने एका कुबड्या स्त्रीला बरे केले तेव्हा कर्मठ सनातन्यांनी एकच गदारोळ केला. तेव्हा येशू त्यांना म्हणाला, "शब्बाथाच्या दिवशी तुम्ही बैल किंवा गाढव गोठ्यातून पाणवठ्यावर नेता ना? मग या दिवशी एखाद्या व्यक्तीला आरोग्यदान देणे वाईट का?" (लूक १३ : १५)

तात्त्विक विवेचनात न गुंतता, दैनंदिन जीवनातील उदाहरण देऊन येशूने आपल्या विरोधकांना गप्प केले.

प्रामाणिक प्रवचनकार आणि भोंदू भगत यांच्यातील फरक स्पष्ट करून देताना ख्रिस्त म्हणतो, ''भोंदू संदेष्ट्यांपासून सावध रहा. ते मेंढराच्या वेषाने तुमच्याकडे येतील; परंतु ते आतून क्रूर लांडग्यासारखे आहेत.'' (मत्तय ७ : १५) बहुरूप्याच्या खेळातील सोंग येशूने पाहिले असावे आणि लोकांनाही ते दृष्य परिचित असावे.

आपले नित्यनैमित्तिक कर्म करीत असताना माणसाने परमेश्वरावर पूर्ण भरवसा ठेवावा हे सांगताना ख्रिस्ताने पक्ष्याचे उदाहरण दिले, ''खावे काय, प्यावे काय, पांघरावे काय असे म्हणत चिंता करीत बसू नका. अन्नापेक्षा जीव आणि वस्त्रांपेक्षा शरीर मौल्यवान आहे की नाही? आकाशात विहार करणाऱ्या पक्ष्याकडे पहा. ते पेरणी करीत नाहीत, कापणी करीत नाहीत, की कोठारात धान्य भरून ठेवीत नाहीत. तरी तुमचा स्वर्गीय पिता त्यांना खायला देतो. त्याला तुमचे मोल त्यांच्यापेक्षा अधिक आहे की नाही?'' (मत्तय ६ : २५-२६)

माणसाने नेहमी भयमुक्त असावे हे सांगताना ख्रिस्त म्हणतो (मत्तय १० : २९, ३१) ''एका पैशाला दोन चिमण्या मिळतात की नाही? तथापि परमेश्वराच्या अनुज्ञेशिवाय एकही भूमीवर पडत नाही. ....तुम्ही निर्भय असा, पुष्कळ चिमण्यांहून तुम्ही अधिक मोलवान आहात!'' (शेक्स्‌पियरने हॅम्लेट ५ : २ मध्ये या कल्पनेचा किती सुंदर उपयोग करून घेतला आहे हे रसिकांना आठवावे. - संपादक)

**निसर्गातील प्रतिमा**

निसर्गातील प्रतिमांचा वापर ख्रिस्ताच्या प्रवचनातून खूप मोठ्या प्रमाणावर झालेला आढळतो. ख्रिस्त निसर्गमित्र होता आणि त्याचे हृदय कवीचे होते. आपल्या निस्संग जीवनशैलीचे वर्णन करताना ख्रिस्त म्हणाला, ''कोल्ह्यांना बिळे आहेत, पक्ष्यांना घरटी आहेत परंतु मानवपुत्राला डोके टेकायला ठिकाण नाही.'' (लूक ९: ५८)

मुमुक्षूने काळाची चिन्हे वाचून त्याप्रमाणे वागले पाहिजे, हे सांगताना ख्रिस्ताने प्रतिपादन केले, ''अंजिराची डहाळी कोमल होऊन तिला पालवी फुटू लागली म्हणजे उन्हाळा जवळ आला हे तुम्ही जाणता. त्याप्रमाणे, बाह्य चिन्हे पाहून माणसाने सतत सजग आणि जागृत राहावे.'' (लूक २१ : २९)

शेतकरी पेरणी कसा करतो, बी रुजते कसे, शेत पिकल्यावरल दिसते कसे याचे सूक्ष्म निरीक्षण ख्रिस्ताने केलेले असावे. देवराज्याविषयी बोलताना तो सांगतो,

"ईश्वराच्या राज्याची गोष्ट अशी आहे की जणू काय एखादा मनुष्य जमिनीत बी पेरतो, त्यानंतर तो आपल्या नित्याच्या कामात गुंतून जातो. इकडे बी रुजून त्याची वाढ होते, परंतु ते कसे घडते ते त्याला कळत नाही. जमीन आपोआप उत्पन्न देते. प्रथम अंकुर फुटतो, मग कणीस येते, नंतर कणसाला भरदार दाणे येतात. धान्य पिकल्यावर कापणीची वेळ आली म्हणून लागलीच तो विळा घालतो." (मार्क ४ : २६-२९) जीवनातील गूढतेवर ख्रिस्ताने या गोष्टीतून प्रकाश टाकला आहे.

माणसामधील सात्त्विकतेचा अंश टिकून राहील आणि दुष्टपणाचे हीण जळून नाहीसे होईल, हे सत्य सांगताना येशू म्हणाला, "देवाच्या माणसाने आपले खळे झाडून स्वच्छ करण्याकरिता आणि गहू आपल्या कोठारात साठवून ठेवण्याकरिता आपल्या हातात सूप धरले आहे. भुसा मात्र अग्नीत नष्ट होईल." (लूक ३ : १७)

जीवनातील महान सत्ये सांगण्यासाठी ख्रिस्ताने आकाश, ढग, पाऊस, वीज, सूर्य, झाडेझुडपे, कळ्या, फुले, पिकलेली शेते, काटेकुसळे अशा निसर्गातील प्रतिमांचा वापर केला.

**दैनंदिन जीवनातील अनुभव**

मीठ हा दररोजच्या वापरातील पदार्थ. आपल्या शिष्यांना ख्रिस्ताने मिठाची उपमा दिली. "तुम्ही पृथ्वीचे मीठ आहात. मिठाची चव गेली तर त्याला खारटपणा कशाने येईल? ते फेकून देऊन माणसाच्या पायाखाली तुडविले जावे या पलीकडे त्याचा दुसरा काही उपयोग नाही." (मत्तय ५ : १३)

विजेचा शोध त्या काळी लागला नव्हता. प्रकाशासाठी दिवा लावला जात असे. तीही उपमा ख्रिस्ताने वापरली, "दिवा लावून तो कोणी मापाखाली झाकून ठेवीत नाहीत, तर दिवठणीवर ठेवतात. त्यामुळे घरातील सर्वांना तो प्रकाश देतो. त्याप्रमाणे तुमच्या कार्याचे तेज सर्वत्र झळकू द्या. म्हणजे देवाचा गौरव होईल." (मत्तय ५ : १४- १५)

पीठ फुगून येण्यासाठी खमिराचा (यीस्टचा) वापर केला जातो. खमिरामुळे पिठाचे मूळ स्वरूप बदलते. ते जणू स्वतःचे सत्त्व हरवून बसते. पिठाशी एकरूप होणे हाच त्याचा गुणधर्म बनतो. आपल्या शिष्यांनी निराळेपण किंवा अलिप्तपण न जपता, व्यापक समाज जीवनाशी समरस व्हावे अशी अपेक्षा करताना ख्रिस्त म्हणाला, "देवाचे राज्य हे खमिराप्रमाणे आहे. पिठाला खमीर लावले म्हणजे पीठ फुगून येते." (मत्तय १३ : ३३) ख्रिस्ताच्या श्रोत्यात महिलांचा फार मोठा भरणा होता. मीठ, पीठ, खमीर असली उदाहरणे त्यांच्या नित्य परिचयातील होती. ख्रिस्ताने त्यांच्या भाषेतून त्यांना उपदेश केला.

**सूत्ररूपाने**

छपाईची कला अस्तित्वात नसल्यामुळे त्याकाळी सूत्ररूपाने शिकवण दिली जात असे. ही सूत्रे मुखोद्‌गत करणे सोपे जात असे. ख्रिस्ताने अनेक गोष्टी सूत्ररूपाने शिकविल्या. उदाहरणार्थ : शेजाऱ्याच्या डोळ्यातील कुसळ दिसते, परंतु स्वतःच्या डोळ्यातील मुसळ दिसत नाही. (मत्तय ७ : ३) ज्याने त्याने आपला क्रूस वाहिला पाहिजे. नांगराला हात घातल्यावर मागे वळून पाहू नये. काटेरी वेलीवरून द्राक्षे अगर रिंगणाच्या झाडावरून अंजीर मिळाले आहे काय? फळावरून झाड ओळखावे आणि कृतीवरून माणूस ओळखावा. (मत्तय १२ : ३३) आम्ही पावा वाजविला परंतु तुम्ही नाच केला नाही. आम्ही आक्रोश केला पण तुम्ही टिपूस गाळले नाही. पवित्र पदार्थ कुत्र्यास घालू नका आणि मोत्ये डुकरापुढे टाकू नका. (मत्तय ७ : ६) पीक भरपूर परंतु कामकरी थोडे आहेत. (मत्तय ९ : ३७) सुईच्या नेढ्यातून उंट जाईल परंतु स्वर्गाच्या दारातून श्रीमंताला प्रवेश मिळणार नाही. (मत्तय ९ : २४) माणूस केवळ भाकरीवर जगत नाही. (मत्तय ४ : ४) अशी अनेक सुभाषिते ख्रिस्ताच्या तोंडून सहजपणे येतात. यातली काही तत्कालीन म्हणी आणि वाक्प्रचार यांवर आधारलेली असावी.

बायबलमधील नव्या करारात मत्तय, मार्क, लूक, आणि योहान यांच्या शुभवर्तमानांमधून येशूच्या कार्याचे वर्णन आले आहे. मार्क संक्षेपाने लिहितो, तर योहान चिंतनशीलतेच्या पातळीवर जातो. मत्तय आणि लूक यांच्या लिखाणातून प्रवचनकार येशूचे अधिक प्रकर्षाने दर्शन घडते. येशूने सांगितलेल्या कथा, गोष्टी, वृत्तांत बोध यांचे वर्णन त्यांनी विस्ताराने केले आहे. ग्रीक ही त्या काळातील पंडितांची भाषा होती आणि अरेमाईक ही ख्रिस्ताच्या कर्मभूमीमधील लोकभाषा होती. या लोकभाषेतून ख्रिस्ताने व्यवहार केला. जनमानसात रुजलेल्या प्रतिमांच्या माध्यमांचा त्याने प्रभावी वापर केला. त्यामुळे एक प्रवचनकार म्हणून लोकांच्या हृदयात त्याला अढळ स्थान मिळाले.

नवा करार हा ख्रिस्ताच्या शिकवणीचा अजोड ठेवा आहे, त्याचबरोबर तो तत्कालीन लोकजीवनाचा आणि लोकवाङ्‌मयाचा अजरामर असा खजिना आहे.

**जीवनदर्शन - केंद्र, गिरीज, वसई ४०१ २०१**



# विषय महत्त्वाचा पण नाजूक

शांता साठे आणि अनंत साठे

कामजीवनविषयक प्रश्नांची चर्चा करणे, लैंगिक शिक्षण देणे हा विषय अतिशय महत्त्वाचा आहे. व्यक्तीचे भावविश्व, आत्मगौरवाची भावना, व्यक्तिगत जीवन, वैवाहिक आयुष्य, पतिपत्नी-नाते, तसेच स्त्रीपुरुषांमधील सामाजिक पातळीवरचे व्यवहार, त्यांचे परस्परांशी वर्तन ह्या सर्वांवर कामजीवनाचा परिणाम होत असतो. किंबहुना लैंगिक स्वास्थ्याचा (sexual health) परिणाम एकंदरच मानवी व्यवहारावर होत असतो हे आता अधिकाधिक जाणवायला लागले आहे. त्या दृष्टीने एक नवीन जागरूकता येते आहे. व्यक्तीव्यक्तींमधील तुटलेली नाती, वाढत्या प्रमाणावरील दुरावलेली मानवी नाती, अवांछित गर्भधारणा, बालजन्म किंवा गर्भपात, वाढत्या प्रमाणावरील लैंगिक संसर्गजन्य व्याधी, साथीचे स्वरूप प्राप्त झालेले भेडसावून टाकणारे एड्‌ज्‌सारखे आजार ह्या सर्वांमुळे ह्या विषयाची निकड आणि तीव्रता अधिकाधिक जाणवायला लागली आहे.

त्याच वेळेला हेही ध्यानात घ्यावे लागते की हा विषय अतिशय नाजूकही आहे. माणसांच्या अतिशय जवळिकीचा आणि खाजगी अनुभवाचा. त्यातला खाजगीपणा जपण्याची प्रत्येकाची प्रवृत्ती आणि प्रयत्न असतो. हा विषय नाजूक ठरण्याचे आणखीही एक कारण आहे. ह्या विषयावर मोकळेपणाने, स्वच्छ मनाने, विश्रब्धपणे चर्चाच होत नाही. चर्चा होते ती अफवा पसरविणे, कंड्या पिकविणे ह्या स्वरूपाची - एक प्रकारच्या विकृत कुतूहलातून. साहजिकच कामजीवनविषयक अडचणींविषयी, आपल्या शरीराला, मनाला काही दुखतखुपत असले तर बोलायला संकोच. 'जे काही होते आहे ते आपल्यालाच' ही भावना. 'कोणाशी बोलले तर हास्यास्पद ठरू का?' ही भीती. आतल्याआत गुदमरा होतो. कोणाकडे जावे कळत नाही.

तर ह्या दोन्ही गोष्टी लक्षात ठेवून पुढे पाऊल टाकले पाहिजे.

प्रारंभीच एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. काम ह्या विषयाची व्याप्ती फार मोठी आहे. स्त्री व पुरुष ह्यांच्यामधील निसर्गदत्त आकर्षण, परस्परांविषयी वाटणारी ओढ, लैंगिक समागमाची इच्छा, त्यापासून मिळणारा आनंद-सुख ह्या सर्वांचे स्वरूप, लैंगिक व्यवहारातील योग्य-अयोग्य, सूक्त-असूक्त, सुंदर-असुंदर, नैसर्गिक-अनैसर्गिक अशा भेदांचा विवेक त्यामध्ये मोडतो; तसेच ह्या सर्वांचा मानवी मनावर व व्यवहारावर होणारा परिणाम हाही त्यामध्ये येतो. 'काम' किंवा

'सेक्स' ह्या शब्दामध्ये इतक्या विविध गोष्टींचा समावेश होतो. केवळ शारीरिकच नव्हे तर मानसिक, भावनिक, सांस्कृतिक आणि सामाजिक अंगांचाही विचार कामजीवनविषयक चर्चेत येतो. म्हणूनच, धर्मप्रवर्तक, ऋषिमुनी, तत्त्वज्ञ, कवी व साहित्यिक, समाजवैज्ञानिक, मनोवैज्ञानिक, कामवैज्ञानिक आणि शिक्षणतज्ञ ह्या सर्वांच्या चिंतनाला पुरून उरलेला हा विषय आहे.

साहजिकच कामजीवनाचे शिक्षण म्हणजे केवळ लैंगिक समागमाचे– शारीरिक मिलनाचे शिक्षण असूच शकत नाही. त्यानंतर प्रथम महत्त्वाचा विषय येतो तो म्हणजे प्रजोत्पादन, अपत्यसंभव, आणि त्याचबरोबर जबाबदार पालकत्व. केवळ लोकसंख्येला आळा घालावा ह्या हेतूने नाही तर आता प्रजोत्पादनावर नियंत्रण घालणे शक्य झाल्यानंतर पालकत्वाबरोबर येणाऱ्या इतर जबाबदाऱ्या पाळण्याच्या दृष्टीने, तयारी करण्याच्या दृष्टीनेही हा विचार महत्त्वाचा. (संततिनियमनाची माहिती त्याचमुळे द्यावी लागते.) लैंगिक शिक्षण देत असताना केवळ शारीरिक घटकांचा विचार करून चालणार नाही. मानसिक–भावनिक बाजूचाही विचार करायला पाहिजे. समागम ही दोघांमधील नाते जोडणारी व दृढ करणारी कृती आहे, केवळ एकाच्या आनंदाचा–सुखाचा विषय नाही, हे लक्षात घ्यायला पाहिजे. दोन व्यक्तींमध्ये संवाद साधण्याचा समागम हा सर्वाधिक जवळिकीचा, शब्दरहित (आणि शब्दांपलीकडे जाणारा) मार्ग आहे. ह्या नात्याचा खरा अर्थ – साद–प्रतिसाद, समरसता आणि एकरूपता – ह्यां परस्परसंवादाचे सौंदर्य. ह्या सर्वाचा विचार उमलत्या पिढीपर्यंत पोहोचविला पाहिजे.

स्त्रीपुरुषसंबंधाविषयीचा समाजाचा दृष्टिकोण, स्त्री–पुरुष–भूमिकांविषयीचे संकेत, त्यांच्या वाट्याला येणाऱ्या सांकेतिक भूमिका, स्त्रीत्व व पुरुषत्व ह्याविषयीच्या रूढ प्रतिमा, स्त्रीपुरुषांबद्दल होणारा नैतिक पक्षपात, स्त्रीकडे बघण्याचा समाजात अस्तित्वात असलेला दूषित दृष्टिकोण (स्त्रीला उपभोग्य वस्तु, पुरुषाच्या रंजनाचे साधन, पुरुषाच्या तुलनेत दुय्यम दर्जाची , स्वतंत्र निर्णय घेण्यास अपात्र, मोक्षमार्गावरील अडसर, कर्तृत्ववान पुरुषाच्या मार्गातील धोंड, भुरळ पाडणारी मोहिनी, किंवा फक्त माता मानणे.) अशा सर्व सांस्कृतिक संचिताचा परिणाम मनुष्याच्या व्यक्तिमत्त्वावर होत असतो. (हे संचित केवळ भारतापुरते मर्यादित नाही, देशोदेशी तीव्रता कमीअधिक असते इतकेच.) तसाच व्यक्तीच्या लैंगिक वर्तनावर आणि लैंगिक स्वास्थ्यावरही परिणाम होत असतो. त्याचे पडसाद समाजजीवनावरही उमटत असतात. म्हणून निकोप कामजीवनाकरता प्रचलित असलेले समज आणि दृष्टिकोण तपासून पाहण्याची फार गरज आहे. लैंगिक शिक्षणाची आवश्यकता ही केवळ पारंपारिक पद्धती मोडल्या आणि नवीन रुजल्या

नाहीत एवढ्याचपुरती मर्यादित नाही, तर कामजीवनविषयक निकोप दृष्टिकोण आणि अभिवृत्ती निर्माण करणे हे सुद्धा लैंगिक शिक्षणाचे एक महत्त्वाचे उद्दिष्ट राहील.

## का शिकवायचे ?

ह्या विषयाचा मागोवा का घ्यावा लागतो? 'लैंगिक बाबतीत शिक्षण देण्याची गरज काय?' 'सगळं आपोआप होतंच की!' शिवाय आता कामप्रेरणा नैसर्गिक व स्वाभाविक आहे, त्यात संकोच बाळगण्यासारखे काही नाही, काम पापमय नाही तर आनंदमय आहे, स्वागतार्ह आहे - हेही बऱ्याच अंशी मान्य झाले आहे. मग शिक्षण कशाला?

मनुष्यप्राणी निव्वळ सहजप्रेरणेवर जगत नाही. त्याला बुद्धी व भावना ह्यांची देणगी लाभलेली आहे. तसेच योग्य–अयोग्य, चांगले–वाईट, सुंदर–असुंदर, ह्याची जाण त्याला असते. रक्ताच्या नात्याची आठवण–आईवडील, मुलगामुलगी, बहीणभाऊ– मानवाला असते. इतर गोष्टींच्या बाबतीतही, अगदी तहानभूक भागवतानाही आपण निव्वळ सहजप्रेरणेप्रमाणे वागत नाही. सर्वच बाबतीत वागण्याचे काही संकेत असतात. ते सर्व जगभर एकसारखे मात्र नाहीत. त्यामधे भिन्नभिन्न प्रथा आहेत, म्हणजेच संस्कृतीमध्ये विविधता आहे. लैंगिक वर्तन, भावना दर्शविण्याची पद्धतही त्याला अपवाद नाही. मानवी कामजीवन मनुष्यपणाला शोभेल असे हवे. निव्वळ नैसर्गिक प्रेरणेवर जगणाऱ्यांचा बनतो तो कळप, सुसंस्कृत समाज नाही.

वाढ आणि विकास होत असताना– विशेषतः यौवनात पदार्पण करत असताना – कोणत्याही व्यक्तीमध्ये जे शारीरिक, मानसिक बदल झपाट्याने होत असतात, काही गोष्टी नव्याने अनुभवाला येतात–उदा. मासिक पाळी, स्वप्नावस्था, काही प्रेरणा–भावना नव्याने जाणवायला लागतात – उदा. आपण आकर्षक दिसावे, दुसऱ्याला आवडावे, मुलांना किंवा मुलींना भिन्न–लिंगी व्यक्तीविषयी एकाच वेळी जाणवलेली लाज, संकोच आणि ओढ, आकर्षण. हे सर्व मनुष्यप्राणी केवळ निमूटपणे स्वीकारत नाही. ह्या सर्वांचा अर्थ कळून घेण्याची इच्छा असते. अर्थ कळला नाही तर चिंतातुरता, काळजी, आशंका उत्पन्न होते. ह्या वयात काही प्रकारचे वर्तनही घडत असते– उदा. हस्तमैथुन. ह्याविषयी बऱ्याचशा चुकीच्या गोष्टी कानावर आलेल्या असतात. त्यामुळे हस्तमैथुनाच्या परिणामांविषयी – विशेषतः स्वतःच्या लैंगिक क्षमतेबाबत – धास्ती. मुलगे ह्या विषयी नेहमी प्रश्न विचारतात असा अनुभव आहे. आपल्या देहप्रतिमेबद्दलही काही कल्पना असतात–उंची, बांधा,

स्पष्टपणे बोलायचे तर काही वेळेला पुरुषाच्या जननेंद्रियाचा आकार, स्त्रियांच्या स्तनांचा घाट, तारुण्यपिटिका, अशा विषयांत समवयस्क समलिंगी मंडळींशी तुलना करण्याचा मोहही होत असतो. ह्यातून काही भयगंड, न्यूनगंड, अहंगंड निर्माण होत असतात. ह्या क्षेत्रात काम करत असताना आमच्या असे लक्षात आले आहे की केवळ नवयुवकच नव्हेत तर कित्येक मध्यमवयीन किंवा त्याहूनही मोठ्या वयातील मंडळींनी ह्या सर्वांचे कितीतरी ओझे बाळगलेले आहे. त्यांची एकच खंत ! आम्हाला वेळेवरच मार्गदर्शन मिळाले असते तर ! योग्य वेळी पुरेसे मार्गदर्शन न मिळाल्यामुळे, तसेच अज्ञान, चुकीच्या अपेक्षा, दुसऱ्या व्यक्तीला समजावून घेण्याची अक्षमता ह्यामुळे कितीतरी नवविवाहितांचीही कुचंबणा झालेली आढळते. ह्या गोष्टीचा पुढील आयुष्यावर खोलवर अनिष्ट परिणाम झाल्याखेरीज राहात नाही. पुढे जुळले तरी आयुष्यातील मोलाची वर्षे वाया गेलेली असतात.

एक महत्त्वाची, लक्षात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे स्त्रीपुरुषांमधील नाते–आकर्षण हे बहुपदरी आणि बहुरंगी असते. स्त्रीपुरुषांमध्ये परस्परांविषयी एक उपजत स्वाभाविक ओढ असते. ह्याचा प्रत्यय स्त्रीपुरुषांच्या संमिश्र समाजात नेहमी येतो. वातावरण अधिक उल्हसित, हलकेफुलके असते. ह्या सर्वांमागे असलेली शारीरिकता सर्वांशाने नाकारणे दांभिकपणाचे ठरेल हे खरे; पण त्याच वेळेला हेही लक्षात ठेवायला हवे की केवळ नर आणि मादी ह्यामधील आकर्षण एवढेच त्याचे स्वरूप नसते. स्त्रीपुरुष आकर्षणाच्या विविध छटा, भिन्नभिन्न परी असतात आणि म्हणूनच स्त्रीपुरुषांमध्ये परस्पर–आपुलकी, निकोप मोकळेपणाचे नाते, निखळ मैत्री–वेळेला आयुष्यभर टिकणारी–संभवते. किंबहुना असेही म्हणायला हरकत नाही की स्त्रीपुरुष नात्याच्या, आकर्षणाच्या इंद्रधनुष्यातील रंगांप्रमाणे विविध छटा असतात. हा अर्थ कळला नाही तर एका अत्यंत सुंदर अनुभवाला आपण मनुष्यप्राणी मुकल्याखेरीज राहणार नाही. याउलट स्त्रीपुरुषांमध्ये निर्भय मोकळेपणा राहिला नाही तर त्याचे परिणाम वर्तनात - लैंगिक फसवणूक, छळणूक आणि पिळवणूक – उमटतात. काही वेळेला आजूबाजूचे लोक विनाकारणच वावड्या उठविणे, जोड्या लावणे असे प्रकार करून दुसऱ्यांचे जीवन असह्य करतात. सामाजिक स्वास्थ्याच्या दृष्टीने स्त्रीपुरुषांमधील निर्भय वातावरण अतिशय आवश्यक आहे. अशा वातावरणातच समता, मानवी प्रतिष्ठा, व्यक्तिस्वातंत्र्य, संस्कृती ह्या शब्दांना अर्थ राहतो. दिवसेंदिवस ह्या प्रश्नाला जास्तच महत्त्व प्राप्त होणार आहे. स्त्री उंबऱ्याआड व पुरुष उंबऱ्याबाहेर अशी वाटणी आजच राहिलेली नाही. यापुढे संमिश्र जीवनाचे प्रमाण वाढणारच आहे. युवकवर्गाला ह्याही प्रकारच्या स्त्रीपुरुष–नात्याची ओळख करून देणे आणि त्याचबरोबर त्याकरता आवश्यक असे

सामाजिक वातावरण निर्माण करणे ही आजच्या काळाची गरज आहे.

दोन अनुभव येथे नमूद करण्याचा मोह होतो आहे. मुलींशी गैरवर्तन केल्याबद्दलच्या तक्रारींची चौकशी करताना त्या महाविद्यालयीन प्राचार्यांच्या लक्षात आले की त्या मुलग्यांना खरा रस केवळ मुलींशी ओळख किंवा मैत्री करण्यापुरता होता; पण मुलामुलींच्या संमिश्र व्यवहाराला अनुकूल वातावरण नसल्यामुळे ह्या मुलांच्या वर्तनाला अनुचित वळण लागले होते. अशा वर्तनाने मुलांचा हेतू सफल होण्याऐवजी त्यात अडथळेच निर्माण होतात हे लक्षात आणून दिल्यावर त्या मुलांच्या वर्तनात सुधारणा आढळून आली. एका शाळेतील विद्यार्थिनींनी आपले मनोगत फार चांगल्या शब्दात आमच्या संस्थेतील कार्यकर्त्यांजवळ व्यक्त केले, 'मुलांनी जबाबदार व्हावे, आम्ही निर्भय होऊ, मोकळेपणाने वागू.'

झपाट्याने वाढत जाणाऱ्या औद्योगीकरणामुळे व शहरीकरणामुळे सामाजिक व आर्थिक परिस्थिती तितक्याच झपाट्याने बदलत आहे. लोकसंख्येची भयानक वाढ व त्यातून निर्माण होणाऱ्या समस्या वाढत आहेत. विवाहाचे वाढते वय, स्त्रीपुरुषांना एकमेकांमध्ये मिसळण्याची घराबाहेरच्या जगातली संधी, वाढत्या गर्दीत आपल्याला कोणी ओळखेल ही भीती कमी झाली आहे आणि त्याच वेळेला एकटेपणा आणि हरवलेपणा मात्र वाढला आहे. भरीला बेकारी व व्यसनाधीनता आहे. लैंगिक भावनांना उद्दीपित करणारी बेजबाबदार प्रसारमाध्यमे व जाहिरातबाजीला ऊत आला आहे. त्यामधून मिळणारी कामजीवनाबद्दलची विकृत व अतिरंजित माहिती लैंगिक स्वैराचारास खतपाणी घालत आहे. ह्या सर्वांमुळे लैंगिक व्याधी व एड्‌जूचा प्रसार भयंकर प्रमाणात होण्याचा, तसेच अवांछित गर्भधारणेचा धोका वाढला आहे. ह्याही कारणांकरता लैंगिक शिक्षण देणे आवश्यक आहे.

मात्र लैंगिक शिक्षणाचा हेतू अवांछित गर्भधारणा टाळणे व लैंगिक व्याधींपासून बचाव एवढ्याच पुरता मर्यादित नाही हे लक्षात घेतले पाहिजे. तशी कल्पना करणे फार नकारात्मक ठरेल. वर म्हटल्याप्रमाणे कामजीवनाकडे पाहण्याचा निकोप दृष्टिकोण निर्माण करणे व त्याकरता अनुकूल सामाजिक वातावरण निर्माण करण्याचा प्रयत्न करणे ह्या उद्दिष्टपूर्तीच्या दृष्टीने लैंगिक शिक्षणाचा विचार हवा. लैंगिक शिक्षण हे केवळ धोक्याचे इशारे नाहीत तर ती स्वास्थ्याची गुरुकिल्ली आहे.

बदलत्या परिस्थितीत आता पालकांनाही लैंगिक शिक्षणाची आवश्यकता काही प्रमाणात जाणवते आहे. पण राहून राहून एक प्रश्न मनाला सतावतो. पालक सुचवितात ते बहुधा आमच्या मुलींना शिकवा म्हणजे त्यांना कोणी फसवणार नाही, मुली वाईट मार्गाला लागणार नाहीत. ह्या विचाराने 'आमच्या मुलग्यांनाही शिकवा

म्हणजे ते दुसऱ्या मुलींना फसवणार नाहीत' असे का म्हटले जात नाही? आग लागते ती दुसऱ्याच्या घरात म्हणून? आता गावोगावी रिंकू पाटील केस आणि तत्सम केसेसच्या आवृत्त्या निघाल्यानंतर तरी पालकांनी ही बाजू लक्षात घ्यायला नको कां? शिवाय आजच्या काळात मुलींनी मुलांना नादी लावल्याची व नंतर त्यांच्याकडे पाठ फिरविल्याची उदाहरणेही घडतात, हेही विसरून चालणार नाही. तेव्हा मुलांच्या स्वतःच्या हिताच्या दृष्टीनेही शिक्षण देणे आवश्यक आहे.

## कुणाला शिकवायचे?

तशी त्या विषयाला सुरुवात बऱ्याच लहान वयापासून होते. आपण जन्माला कसे आलो ह्या विषयीची जिज्ञासा, मुलगा किंवा मुलगी म्हणून आपण दुसऱ्यापासून वेगळे कसे हे जाणून घेण्याची उत्सुकता, इच्छा, स्वतःच्या शरीराचा शोध घेण्याच्या प्रवृत्तीमधून लहानपणी– विशेषतः मुलग्यांमध्ये– स्वतःच्या इंद्रियाशी चाळा करण्याची प्रवृत्ती– ह्या वेळी आपली मोठ्या माणसांची प्रतिक्रिया कशी होते ह्यावर खूप गोष्टी अवलंबून असतात. ह्या बाबतीत पालकांना पूर्वशिक्षण देणे आवश्यक आहे. वेळ येईल तेव्हा पाहू असा विचार पालकांनी करून चालणार नाही. आपली तयारी त्यांनी अगोदरच करणे आवश्यक आहे. ज्यांची मुले आता तारुण्याच्या उंबरठ्यावर आहेत अशा पालकांना तर अशा प्रकारे मार्गदर्शन विशेषच आवश्यक आहे.

केवळ नवविवाहितांमध्येच नव्हे तर प्रौढवयीन व्यक्तींमध्येही कामजीवन–विषयक अपुऱ्या ज्ञानामुळे, काही चुकीच्या कल्पनांमुळे, समाजात प्रचलित असलेल्या काही अपसमजांमुळे एकंदर प्रकृतिस्वास्थ्य व कामजीवन ह्यामधील परस्परसंबंधाविषयी पुरेशी माहिती नसल्यामुळे बरेच प्रश्न जाणवतात. उदा. मुले मोठी झाल्यावरही, नातवंड घरात आल्यानंतरही पतीबद्दल (किंवा पत्नीबद्दल) शारीरिक ओढ वाटणे हे योग्य आहे कां? काही आजारांमुळे म्हणा, काही औषधोपचारांमुळे म्हणा कामेच्छेवर आणि समागमक्षमतेवर विपरित परिणाम होतो आणि तो टिकाऊ असतो (किंवा तात्पुरता असतो) हे माहित नसल्यामुळे वाटणारी चिंता, काळजी. म्हणजे प्रौढांनाही माहिती पुरविणे आवश्यक. पण खरा आणि मुख्य प्रश्न आहे तो नव्याने तारुण्यात पदार्पण करणाऱ्या पौगंडावस्थेतील वा वाढाळू वयातील वर्गाचा. पण हाही वयोगट एकसंध नाही.

साधारणतः ह्या गटात बारा ते पंचवीस ह्या वयातील मुलामुलींचा समावेश करण्यात येतो. (मुलींच्या बाबतीत तर कांही वेळेला एकदोन वर्षे अगोदरच हे शिक्षण देणे आवश्यक बनते.) अगदी सुरुवातीची अनघड अवस्थेतील मुलेमुली व





अनुक्रमणिका

सोळा ते अठरा वर्षांवरील मुलेमुली ह्यांच्यात फरक करावाच लागतो. मुलग्यांना आणि मुलींना जाणवणाऱ्या अडचणी आणि प्रश्न वेगळे असतात. मुलामुलींच्या शिक्षणाची पातळी लक्षात घ्यावी लागते. तसेच आईवडिलांच्या छत्राखाली, सुरक्षित वातावरणात वाढलेली मुलें आणि झोपडपट्टीत राहून बऱ्याच वेळेला स्वतःच्या हिंमतीवर जीवनाशी सामना देणारी मुले ह्यांना उपलब्ध झालेल्या माहितीत फरक तर असतोच, पण त्यांचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोणही खूप वेगळा असतो. त्यामुळे सब घोडे बारा टक्के चालत नाही. शिक्षार्थीचे वय, लिंग, शिक्षण, त्याला अगोदरच मिळालेली माहिती व सामाजिक पार्श्वभूमी ह्यांना अनुसरूनच काय शिकवायचे आणि ते कसे शिकवायचे ह्याची उत्तरे शोधावी लागतील. शिक्षण देत असताना शिक्षार्थीच्या बुद्धीचा व समजशक्तीचा आवाका लक्षात घेणेही आवश्यक असते.

## काय काय शिकवायचे?

लैंगिक शिक्षणात सर्वसाधारणतः पुढील विषयांचा समावेश करावा लागतो. अर्थात सर्वांनाच समळ्याच विषयांची सारखीच गरज नसते; तसेच शिक्षार्थीचा वकूब आणि क्षमता ओळखून आशय व पद्धतीत बदल करावा लागतो हे आपण अगोदरच पाहिले आहे.

(१) पौगंडावस्थेत होत असलेल्या वाढीविकासाविषयी व बदलांविषयी शास्त्रीय माहिती. ह्यासंबंधी मुलामुलींच्या मनात असलेल्या शंका दूर करायच्या. समाजात प्रचलित असलेले काही समज – उदा. स्वप्नावस्था, हस्तमैथुन, मासिकपाळी – ह्यांविषयी शास्त्रीय माहिती त्यांना द्यायची.

(२) मानवी जननसंस्थेची रचना व कार्य, मासिक पाळीविषयी वस्तुस्थिती शास्त्रीयरीत्या समजावून द्यायची.

(३) अपत्यसंभव – प्रजोत्पादन-प्रक्रिया ह्या विषयी माहिती. अजूनही ह्याविषयी पुरेशी माहिती दिली जात नाही. केवळ मुलग्यांपासून / पुरुषांपासून जपून रहा एवढेच सांगितले जाते; पण जपून रहा म्हणजे काय आणि का ते समजावून दिले जात नाही. प्रजोत्पादनासोबत येणाऱ्या पालकत्वाच्या जबाबदाऱ्या सांगणे तसेच कुटुंबनियोजनाविषयी, संतातिनियमनाच्या साधनांविषयी माहिती देणे – राष्ट्रीय पातळीवर लोकसंख्येला आळा घालणे व वैयक्तिक पातळीवर जीवनाची गुणवत्ता वाढविणे आणि जबाबदार पालकत्व स्वीकारणे ह्या दृष्टीने.

(४) समागमाविषयी, संभोगक्रियेविषयी मानवी दृष्टिकोणातून शास्त्रीय माहिती. समागम ही दोघांनाही आनंद देणारी कृती असली पाहिजे हे समजावून

सांगून ह्या नात्यातील पारस्परिकतेवर (mutuality), दोघांमधील सादप्रतिसादावर, भर देणे. शारीरिक सुखापलीकडचा आनंद असतो, दोघांची भावनिक गुंतवणूक असते हे निदर्शनाला आणणे.

(५) 'स्त्रीत्व' आणि 'पुरुषत्व' याविषयींच्या संकल्पनांचा जाणीवपूर्वक विचार करणे.

(६) तसेच 'स्त्री' - 'पुरुष' यांच्या पारंपरिक भूमिका, तसेच ह्या बाबतीतल्या बदलांचा मागोवा घेणे.

(७) नव्याने निर्माण झालेल्या- जाणवलेल्या स्त्रीपुरुषांमधील आकर्षणाविषयी बोलणे. ह्या आकर्षणाच्या विविध छटा, विविध परी उदा. आपुलकी, मैत्री, प्रेम-ह्यांची जाणीव व ओळख करून देणे.

(८) प्रेम आणि क्षणिक मोह (आकर्षण) (love and infatuation) ह्यातला फरक समजाविणे. उमलत्या वयात- अजून पुरेशी मानसिक प्रगल्भता आलेली नसताना जाणवणाऱ्या आकर्षणाला (calflove) प्रेम समजण्यातील चूक दाखवून देणे. अनघड वयातील मुलांना, विशेषतः मुलींना -काही वेळेला आपल्या शिक्षकांविषयी तीव्र ओढ व आकर्षण (crush) जाणवते. त्यासंबंधी मोकळेपणाने बोलणे.

(९) आपले मनोगत कसे व्यक्त करावे? मैत्री कशी जुळवावी? संज्ञापन कसे साधावे?– ह्या विषयी मार्गदर्शन. प्रत्येक समाजामध्ये स्त्रीपुरुषांमधील वर्तनासंबंधी काही मान्य असे संकेत असतात; ते काय आहेत हे समजावून देणे. हे प्रस्थापित संकेतच पाळले पाहिजेत असा आग्रह धरणे अर्थातच चुकीचे. पण हे संकेत आपण पाळणार नसलो तर आपले हेतू, उद्दिष्टे, आपल्या मनातील भावना स्पष्ट करण्याची आवश्यकता समजावून देणे.

(१०) आत्मसन्मान राखणे, तसेच दुसऱ्याचा आदर करणे. ह्या वयात एखाद्या व्यक्तीविषयी प्रेम वाटणे, आकर्षण वाटणे स्वाभाविक आहे; पण माझे प्रेम दुसऱ्या व्यक्तीने स्वीकारलेच पाहिजे ह्या वृत्तीतील चूक, त्यातून दुसऱ्या व्यक्तीवर होणारा अन्याय समजावून सांगणे. स्त्रीपुरुषसंबंधातील जुलूम–जबरदस्ती, फसवणूक आणि खोटी आश्वासने ह्यातील अन्याय, अनीती निदर्शनाला आणून देणे. ह्या वयात विभूतिपूजेची आणि वीरपूजेची प्रवृत्ती आणि विशेषतः मुलींमध्ये आत्मसमर्पणाची-- सर्वस्वसमर्पणाची भावना असते. त्या भावनेचा गैरफायदा घेतला जाण्याचा धोका स्पष्ट करणे.

(११) काही वेळेला– विशेषतः मुलींना – नको अशा लैंगिक सलगीचे अनुभव येतात. त्याला निर्भयतनेने तोंड कसे द्यावयाचे, तसेच अशा अनुभवाचा

भावनिक आघात (उदा. कायमची धास्ती बसणे, स्वतःला अपवित्र समजणे) कसा टाळावयाचा ह्या विषयी मार्गदर्शन करणे.

(१२) कामप्रेरणेचा जोर किती असतो ते स्पष्ट करून सांगणे. मुलेमुली पुष्कळदा विचारतात, 'आमच्यावर विश्वास नाही का?' प्रश्न विश्वासाचा किंवा आत्मविश्वासाचा नाही. कामप्रेरणेपुढे भले भले वाहून जातात. महाभारतात पदोपदी उदाहरणे आहेतच. त्या दृष्टीने काही प्रसंग कसे टाळावयाचे ह्याविषयी सूचना देणे.

(१३) स्वैर, बेजबाबदार लैंगिक वर्तनाचे होणारे दुष्परिणाम - शारीरिक (लैंगिक संसर्गजन्य रोग, एड्ज्, अवांछित गर्भधारणा, गर्भपात) तसेच भावनिक (भावनिक असंतुलन, स्वतःबद्दल तुच्छताभाव) समजावून सांगणे, तसेच आपल्या वर्तनाची जबाबदारी स्वीकारण्याविषयी जाणीव देणे.

(१४) विविध लैंगिक संसर्गजन्य रोग, विशेषतः एड्ज् ह्यांचे स्वरूप आणि त्यांचा प्रसार कसा होतो ह्याविषयी माहिती देणे.

## काही शंका आणि त्यांचे निरसन

लैंगिक शिक्षण द्यायला हवे हे मान्य असणाऱ्यांच्या मनामध्येसुद्धा काही प्रामाणिक शंका असतात.

(१) लैंगिक शिक्षण दिले तर मुले अपक्व वयात प्रयोग तर करून पाहणार नाहीत? प्रथम एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. आपण शिक्षण न दिलें तर मुले वयात येण्याची थांबणार आहेत कां? वयानुरूप जाणवणाऱ्या भावना, शारीरिक ओढ निर्माणच होणार नाही का? त्याप्रमाणे वर्तन करावेसे वाटणार नाही का? त्यांच्या मनांत उत्सुकता उत्पन्न होणार नाही का? हे सर्व होणार नसेल तर गोष्ट वेगळी. उलट असे अनुभवाला आलेले आहे की आपण मोठ्या मंडळींनी (पालक व शिक्षक) योग्य ती माहिती, योग्य त्या वेळी व योग्य त्या पद्धतीने( कोणती माहिती कोणत्या वेळेला द्यायची याचा विवेक अर्थातच ठेवायला हवा, याचे पक्के वेळापत्रक मात्र ठरविता येणार नाही) मुलामुलींपर्यंत पोहोचविली नाही तर मुलेमुली विशेषतः मुलगे ती माहिती मिळविण्याचा प्रयत्न केल्याशिवाय राहत नाहीत. उलट ती त्यांना चुकीच्या माध्यमांतून मिळते : बरोबरीचा मित्रपरिवार (पुष्कळदा अडाणी आणि घमेंडखोर), काही वेळेला नोकरमाणसे, कामोत्तेजक चित्रपट आणि वाङ्मय. ही माहिती अवास्तव, अशास्त्रीय, अतिरंजित तर असतेच, शिवाय त्यात जबाबदारी, प्रेम, मानवी नाते ह्यांविषयी काहीही उद्‌बोधन केलेले नसते. मुलांमुलींच्या विवाहपूर्व लैंगिक वर्तनाविषयी केलेल्या विविध पाहण्यांमधून मुलामुलींच्या विवाहपूर्व लैंगिक संबंधाबाबत पुढील कारणे स्पष्ट झाली आहेत.

(क) पौरुष, मर्दानगी बद्दलच्या चुकीच्या कल्पना.

(ख) आपण आकर्षक आहोत या कल्पनेने अवाजवी अहंकार जोपासणे.

(ग) आपल्यात काही कमतरता तर नाही ना ह्या धास्तीने प्रयोग करून पाहणे.

(घ) घरात इतर मंडळींशी सुसंवाद नसल्यामुळे इतरत्र प्रेमस्थाने शोधणे. तसेच पालकांविरुद्ध बंडाची भावना असली तर तिला वाट करुन देणे.

(ङ) समवयस्कांचे दडपण.

याउलट योग्य पद्धतीने शिक्षण दिल्यास आपल्या मूलप्रेरणा कशा हाताळायच्या, त्या भावनांना कशी वाट करून द्यायची ते कळेल. नैसर्गिक कुतूहलाला विकृत वळण लागण्याचा संभव कमी होईल. अग्नीविषयी योग्य माहिती असलेलेच अग्नीचा विधायक वापर करून शकतात, हे लक्षात घेण्यासारखे आहे. अज्ञान म्हणजे निरागसता नव्हे हे आपल्याला जितक्या लवकर उमजेल तितके बरे.

लैंगिक शिक्षण दिल्याने सर्व प्रश्न सुटतील, माणसांच्या हातून चुका होणारच नाहीत, सर्व काही आबादीआबाद होईल असा भोळसट समज बाळगणे मात्र चूक आहे. मानवी भावना व व्यवहार अशा सरळ रेषेत चालत नसतात.

(२) ह्या बाबतीतली दुसरी शंका. पाश्चात्त्य राष्ट्रांमधून लैंगिक शिक्षण दिले जाते. तरीही विवाहपूर्व व विवाहबाह्य संबंध हे तर सोडाच पण विविध प्रकारचा लैंगिक जाच, छळणूक आणि अत्याचार चालूच आहेत. गुप्तरोगाचे व अवांछित गर्भधारणेचे प्रमाण वाढत आहे, स्वतः अजून मूलवयाच्या असलेल्या मुली वाढत्या संख्येने माता बनत आहेत किंवा गर्भपाताला सामोऱ्या जात आहेत. मग शिक्षणाचा फायदा काय झाला? एक तर आपल्याला वाटते तितक्या प्रमाणात आणि तितक्या प्रगल्भतने पाश्चात्य देशातही शिक्षण दिले जात नाही. कामजीवनाच्या शारीरिक घटकांबरोबर भावनिक आणि नैतिक घटकांची पुरेशी जाणीव करून दिली जात नाही. काही वेळा तर चक्क व्यायामशिक्षकावर जबाबदारी ढकलून शाळाचालक व पालक मंडळी मोकळी होतात! पाश्चात्य राष्ट्रांतूनही ह्या त्रुटीची जाणीव आता कुठे व्हायला लागली आहे. ह्या परिस्थितीच्या जोडीला तेथील चंगळवादी सामाजिक वातावरणाचाही परिणाम होतच असतोः

(क) आयुष्यातील एकंदर सुखांपैकी लैंगिक सुखावर, त्यातील शारीरिकतेवर अतिरिक्त भर, त्याविषयी प्रौढीची भावना जोपासणे.

(ख) भावनिक नात्याचा विचार कमी असणे.

(ग) जीवन आत्मकेन्द्री असणे.

(घ) उपभोगवादी वृत्ती.

(ड) जाहिरातबाजीमध्ये कामोत्तेजकतेचा सर्रास उपयोग.

(च) भोवतालच्या मोठ्या माणसांचे दुर्वर्तन.

ह्या सर्व गोष्टींचाही परिणाम होत असतो. लैंगिक शिक्षण परिणामकारक व्हायला हवे असेल तर ह्या सर्वांचा विचार व्हायला हवा.

फॅमिली प्लॅनिंग असोसिअेशन ऑव्ह इंडिया, पुणे शाखा ह्या संस्थेतर्फे शालेय आणि महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना– तसेच समवयीन पण शाळा–महाविद्यालयांतून न जाणाऱ्या मुलामुलींकरिता– लैंगिक शिक्षण देण्याचा उपक्रम गेली काही वर्षे चालविला जातो आहे. काही प्रतिक्रिया येथे नोंदणे उद्बोधक ठरेल.

(१) मासिक पाळीकडे –'स्त्रीत्वा' कडे पाहण्याचा दृष्टिकोण बदलला. धास्ती, तिटकारा, न्यूनभाव कमी झाला.

(२) वीर्यपात, स्वप्नावस्था, हस्तमैथुन, एकंदर देहप्रतिमा ह्या विषयीच्या मनातल्या शंका दूर झाल्या.

(३) अशा नाजूक विषयावर मोकळेपणाने चर्चा करायला मिळाली, शंकानिरसन करता आले त्यामुळे मानसिक-भावनिक दिलासा वाटला, ताण कमी झाला.

(४) आता आम्हाला कोणी फसवू शकणार नाही हा आत्मविश्वास वाढीला लागला.

(५) कोणाशी कसे वागावे कळू शकेल.

(६) ज्यांनी कामोत्तेजक लघुपट (blue films) पाहिलेले आहेत अशा मुलांना शास्त्रीय पातळीवर लैंगिक शिक्षण दिल्यानंतर त्यातील कांही गटांशी चर्चा केल्यावर असे आढळले की कामोत्तेजक लघुपटांमधील अवास्तवता, अतिरंजितपणा आणि अशास्त्रीयता त्यांना जाणवली.

(७) एका शालासंचालकांचा अभिप्रायः तुम्ही शिकवून गेल्यानंतर आमच्या शाळेतील संडासमोरीच्या भिंतीवरील चित्रकला आणि वाङ्मय बंद झाले.

संस्थेला मिळालेले हे प्रतिपोषण (फीडबॅक) नक्कीच दिलासा देणार आहे.

## कुणी शिकवायचे? आणि कसे शिकवायचे?

इतर विषयांचे शिक्षण आणि कामजीवनाचे शिक्षण ह्यातील फरक लक्षात घेणे जरुरीचे आहे. विषय अतिशय नाजूक. मोकळेपणाने आणि त्याच वेळेला अतिशय सावधानतेने व हळुवारपणे हाताळायला हवा. त्यामुळे शिकवायचे कुणी, हा प्रश्न फार महत्त्वाचा ठरतो. प्रशिक्षित व्यक्तीने एवढेच उत्तर पुरेसे ठरत नाही.

कामजीवनाचा संबंध शरीराशी, तसेच बुद्धीशी व भावनेशी, व्यक्तीशी तसेच कुटुंबाशी आणि समाजाशीही. त्यामुळे नुसते तेवढ्याच विषयाचे ज्ञान असून पुरणार नाही, तर इतरांकरता कळकळ असलेली, बांधिलकी मानणारी विविध क्षेत्रातली मंडळी, मानसोपचारतज्ज्ञ, मनोवैज्ञानिक, समाजवैज्ञानिक, आणि शिक्षणतज्ज्ञ एकत्र येणे आवश्यक. हा केवळ डॉक्टरमंडळींनी हाताळायचा विषय नाही.

सद्यस्थितीत एक मोठी अडचण जाणवते. कामजीवन–शिक्षण ह्या विषयातील तज्ज्ञांची संख्या भारतात तरी ह्या घटकेला मोजकी आहे. सर्वांना शिक्षण द्यायला ते कुठपर्यंत पुरे पडणार? सर्वच ठिकाणी हे तज्ज्ञ पोहोचू शकणार नाहीत- वेळ, स्थळ, आणि संख्या ह्या तिन्ही पातळीवर कमतरता राहणार. पण एक करता येईल. ह्या विषयाचे महत्त्व ज्यांना पटले आहे व ह्या क्षेत्रात स्वयंसेवी वृत्तीने काम करण्याची ज्यांची तयारी आहे अशांना ही तज्ज्ञ मंडळी मार्गदर्शन करू शकतील. शाळा-महाविद्यालयातील शिक्षक व युवकांशी निगडित अशा संस्थांमधून, संघटनांमधून काम करणारे कार्यकर्ते ह्या बाबतीत महत्त्वाची भूमिका बजावू शकतील. त्यांचा उमलत्या पिढीशी प्रत्यक्ष संपर्क येत असतो व परस्पर–विश्वासाचे नाते अगोदरच निर्माण झालेले असते.

शिक्षणसंस्थांचा अनुत्साह असतो, युवकवर्गात काम करणाऱ्या संघटनांनाही ह्या विषयाची निकड व महत्त्व पुरेसे जाणवलेले नाही. त्यामुळे युवकवर्गापर्यंत पोहोचणेच कठीण होते.

सुदैवाने लैंगिक शिक्षण हा विषय आता पूर्वीसारखा निषिद्ध समजला जात नाही. ह्या विषयात काम होण्याची आवश्यकताही आता जाणवते आहे. पण अजूनही ह्या क्षेत्रात प्रत्यक्ष काम करणाऱ्यांची संख्या मात्र फारच कमी आहे. कदाचित् ह्या विषयाबद्दलचा संकोच, भीड आड येत असावीत. त्याहीपेक्षा आपण या क्षेत्रात काही योगदान, काम करू शकतो ह्याची पुरेशी कल्पना व आत्मविश्वास नसावा. वस्तुतः ह्याबाबतीत आस्था असलेल्या मंडळींनी मनावर घेतले तर ह्या क्षेत्रात मोलाची भूमिका बजावणे त्यांना अगदी सहज शक्य आहे.

प्रथम एक गोष्ट लक्षात ठेवणे आवश्यक आहे. कामजीवन सल्ला किंवा कामविकृती – उपचार ह्या क्षेत्रात काम करण्याकरता जितकी तज्ज्ञता लागते तितकी ह्या क्षेत्रात आवश्यक नाही. व्यक्तीची कामजीवनविषयक समस्या तीव्र असली तरच कामजीवन–सल्लागार वा उपचारतज्ज्ञ ह्यांची गरज लागते. एरवी निरामय कामजीवनाकरता आवश्यक एवढी माहिती सर्वसाधारण व्यक्तीपर्यंत पोहोचविण्याकरता पुरेसे ज्ञान व ते ज्ञान मुलांपर्यंत परिणामकारकरीत्या पोहोचविण्याकरता आवश्यक असलेले कौशल्य मिळविण्याच्या दृष्टीने आवश्यक ते

मार्गदर्शन तज्ज्ञांकडून घेता येईल. त्या बाबतीत प्रशिक्षण घेता येईल. (निदान विशिष्ट प्रकरण (केस) आपल्या आटोक्यातले नाही हे लक्षात आल्यावर हा लोकशिक्षक संबंधित मुला-मुलीला तज्ज्ञाकडे पाठवू शकेल. तज्ज्ञमंडळींनाही लोकशिक्षकांच्या कार्याचा लाभ होईल. एरवी तज्ज्ञांचे प्रत्यक्ष प्रयत्न मर्यादितच राहू शकतात. विविध ठिकाणी मोठ्या प्रमाणावर हा विषय शिकविला गेला तर शिक्षकांकडून मिळणारे प्रतिपोषण (फीडबॅक) तज्ज्ञांनाही अधिक सजग करील. तज्ज्ञांनाही ह्या अनुभवातून शिकायला मिळेल. ह्याकरता एक गोष्ट मात्र आवश्यक आहे. ह्या विषयातील तज्ज्ञ व ही शिक्षक म्हणून काम करू इच्छिणारी मंडळी ह्यांमध्ये सतत संपर्क, अनुभवाची देवाणघेवाण महत्त्वाची, उजळणी - शिक्षणक्रमातून ज्ञानाला उजळा देणे, तसेच ज्ञान अद्ययावत् ठेवणे आवश्यक. तज्ज्ञ व शिक्षार्थी ह्या साखळीतील उपयुक्त व परिणामकारक दुवा म्हणून ही मंडळी महत्त्वाचे काम करू शकतील. (अशा मंडळींकडून सहायक लोकशिक्षणाचे काम करून घेण्याबद्दलचा आमच्या संस्थेचा अनुभव हुरूप देणारा आहे.)




विषयाचे स्वरूप लक्षात घेता ह्या क्षेत्रात काम करणारा शिक्षक कसा असावा याचा विचार आता करायला हवा.

(१) ह्या विषयाचे महत्त्व शिक्षकाला स्वतःला जाणवलेले पाहिजे. तसेच शिक्षकाचा स्त्री-पुरुष-नात्याकडे पाहण्याचा स्वतःचा दृष्टिकोण निकोप असावा. कामजीवनाकडे पाहण्याची अभिवृत्ती भावात्मक आणि विधायक (positive attitude) असावी.

(२) हा विषय युवकांपर्यंत पोहोचविण्याचे महत्त्व जाणवून, त्याविषयी आत्मीयता हवी. भाडोत्री वृत्ती नसावी.

(३) शिक्षार्थी मुलामुलींबद्दल आस्था व कळकळ हवी. वाढाळू वयातील मुलांच्या भावविश्वाशी ओळख हवी.

(४) ह्या विषयाची संकल्पना व व्याप्ती ह्याची शिक्षकाला ओळख हवी.

(५) मुलांशी संवाद साधण्याचे कौशल्य व मुलांना जाणून घेण्याचा अनुभव हवा. मग शिक्षकाच्या वयाचा तितका प्रश्न येत नाही.

(६) विषय नाजूक. साधारणतः ज्याविषयी मोकळेपणाने बोलले जात नाही असा. साधारणतः ज्या अवयवांचा आणि अनुभवांचा उल्लेख करणे शिष्टसंमत

समजले जात नाही अशांविषयी बोलावे लागते. त्यामुळे ह्या विषयासंबंधी मोकळेपणाने, सोप्या पद्धतीने, नेमकेपणाने आणि सहजपणे बोलण्याचा योग्य तो आत्मविश्वास शिक्षकाला हवा. विषय नाजूक. शब्दयोजना, भाषा, अभिव्यक्ती चुकली तर शिक्षणाचे प्रयोजनच साध्य होणार नाही.

औपचारिक शालेय शिक्षण, निमऔपचारिक शिबिरे तसेच अनौपचारिक घरगुती शिक्षण अशा विविध ठिकाणी हे शिक्षण देता येते. अनौपचारिक घरगुती शिक्षणाकरता पालकांचाही सहभाग मिळू शकतो. काही वेळेला प्रत्यक्ष स्वतःच्या मुलाला किंवा मुलीला सांगताना अधिक संकोच होतो. पण आपल्या भावाबहिणीच्या किंवा मित्रमैत्रिणीच्या मुलामुलीला सांगणे त्या मानाने सोपे जाते. तोही प्रयोग करून पाहता येईल. औपचारिक किंवा निमऔपचारिक पातळीवर काम करत असताना तीस ते पन्नासचा शिक्षार्थींचा गट अधिक उपयुक्त ठरतो. याहून लहान गटात तितका मोकळेपणा राहत नाही; तर याहून मोठ्या गटात वैयक्तिक लक्ष देता येत नाही.

ह्या विषय शिकवताना काही अडचणी नेहमी जाणवतात.

(१) विषयाचा बहुपदरीपणा : पूर्वी म्हटल्याप्रमाणे ह्या विषयाची व्याप्ती अतिशय मोठी आहे. विषय शिकवताना ह्या सर्वांचे भान ठेवणे कठीण जाते.

(२) विषय नाजूक : शिक्षकाचे सांगणे रुक्ष वा कंटाळवाणे होऊ नये, मुलांना विषय शिकताना दडपण येऊ नये तर रस वाटावा, मुलांशी चांगला संवाद साधला जावा, त्यांना मोकळेपणा वाटावा, तसेच स्त्रीपुरुषनात्यातले सौंदर्य कळावे ह्या सर्वच दृष्टीने वातावरण काहीसे हलकेफुलके (light mood) असणे आवश्यक आहे. पण त्याच वेळेला पुरेसे भान राहिले नाही तर विषय सवंग होण्याचा धोका.

(३) शिक्षकाचे वय, लिंग आणि शिक्षार्थीचे वय आणि लिंग ह्यांचा मेळ जमला नाही तर शिक्षकाच्या शिकविण्यात सहजता राहत नाही. एक मात्र सुचवावेसे वाटते. हा विषयच असा आहे की त्यात स्त्रीपुरुषनात्याला फार महत्त्व आहे आणि त्यासाठीच पुरुषांच्या बरोबरीने स्त्रियांनीही ह्या उपक्रमात सामील व्हायला पाहिजे. ह्या क्षेत्रात गेली कित्येक वर्षे काम करत असताना आमचा असा अनुभव आहे की मुलग्यांना वा पुरुषांना शिक्षण देण्याच्या कामात स्त्रियांचा सहभाग असला तर त्याचा निश्चितपणे विधायक, भावात्मक परिणाम होतो. ह्या विषयावर स्त्रीही निःसंकोचपणे बोलते– तिच्याशी मोकळी चर्चा होऊ शकते याचे जणू प्रात्यक्षिक अनुभवल्यानंतर कामजीवनाकडे, स्त्रीकडे, एकंदर स्त्रीपुरुषनात्याकडे बघण्याचा दृष्टिकोण अधिक निकोप होतो.

(४) शिक्षार्थींच्या प्रतिक्रिया : विषयाचे स्वरूप लक्षात घेता किशोरवयीन

शिक्षार्थींमध्ये (किंवा ग्रामीण प्रौढांमध्ये) हसणे, एकमेकाला कोपरखळ्या देणे किंवा चिमटे काढणे ह्या प्रतिक्रिया अपेक्षित. त्यामुळे शिक्षकाने बावचळू नये. काही शिक्षार्थी मात्र शिक्षकाला मुद्दामच अडचणीत टाकणारे किंवा टारगटपणाकडे कललेले प्रश्न विचारतात किंवा प्रतिक्रिया देतात. असे प्रश्न हाताळण्याची मनाची तयारी हवी.

(५) त्याचप्रमाणे शिक्षार्थी मुलांचे व मुलींचे– काही विषयांकरता तरी – वेगळे गट करणे चांगले. एक तर मुलांना व मुलींना जाणवणारे प्रश्न व अडचणी वेगवेगळ्या असतात. दुसरे अशा नाजूक विषयाची माहिती करून घेत असताना आवश्यक असणारे निःसंकोच वातावरण संमिश्र गटात पुष्कळदा राहत नाही. मुली संकोचतात तर काही बेजबाबदार मुले अशिष्ट पद्धतीचे वर्तन करतात.

(६) सामाजिक पूर्वग्रहांचा तसेच सांस्कृतिक भिन्नतेचा अडसर विचारपूर्वक दूर करावा लागतो.

(७) योग्य अशी परिभाषा : आज एक प्रमुख अडचण जाणवते ती परिभाषेची. परिभाषेमध्ये नेमकेपणा आणि सोपेपणा, तसेच तटस्थपणा आणि सहजपणा ह्यांचा मेळ आवश्यक असतो. हा विषय शिकवत असताना पदोपदी योग्य शब्द सापडत नसल्याचे जाणवते. कोशाच्या आधारे शब्द बनविले तर कृत्रिमता येते. वापरामुळे शब्दाला नेमका अर्थ येतो किंवा बदलतोही. पुन्हा दर वीस कोसाला बोली–भाषा बदलते. शास्त्रीय परिभाषा वापरण्यातला एक तोटा म्हणजे एक तर ती समजत नाही आणि अशा भाषेत शिकवणारी व्यक्ती परकी वाटते. बोलीभाषा वापरली तर आपण अडाणी आहोत म्हणून मुद्दाम खिजविण्याकरता ही भाषा वापरतात असा ग्रह होऊ शकतो आणि शिक्षक व शिक्षार्थी ह्यामधील दरी कायम राहते. संज्ञा निवडताना बरेच तारतम्य बाळगावे लागते. परिभाषा निश्चित करणे एक निकडीची गरज आहे.

शिक्षणाच्या क्षेत्रात काम करू इच्छिणाऱ्या मंडळींनी ह्या सर्व अडचणींची जाणीव ठेवणे आवश्यक आहे.

### शिक्षणाची साधने

शिक्षणाची साधने विविध आहेत, व त्या त्या प्रकारच्या साधनांचे काही फायदे व काही मर्यादाही आहेत याची जाण लोकशिक्षकाला असणे आवश्यक आहे.

(१) पुस्तके : आपल्यासारख्या निरक्षरांच्या देशात छापील पुस्तके ह्या कामी पुरी पडू शकत नाहीत हे तर ओघाने आलेच. शिवाय पुस्तकांच्या द्वारा ज्ञान हा शेवटी एकेरी वाहतुकीचा प्रकार ठरतो. वाचकांचे वैयक्तिक शंकासमाधान,

समस्या–निराकरण, गरजा त्यातून पुऱ्या होणे कठीणच. तरीही विषयाला तोंड फोडायला, सुरुवात करायला किंवा संदर्भ म्हणून पुस्तकांचा उपयोग होतो.

(२) चित्रे, चल चित्रे, आकृती ह्यांच्या साहाय्याने विषय समजावून सांगणे सोपे जाते. ही साधने पोस्टर, पारदर्शिका, फिल्म या स्वरूपात उपलब्ध असतात; पण पारदर्शिका वा फिल्म दाखवायच्या तर प्रोजेक्टरची आवश्यकता ही काहीशी खर्चाची बाब, वीज पुरवठ्याची अनिश्चिती, शिवाय संपूर्ण अंधार असलेले सभागृह उपलब्ध होणे आवश्यक. चित्रांवरून किंवा पारदर्शिकांवरून त्रिमितीची कल्पना येणे कठीण. त्या दृष्टीने त्रिमिती नमुन्यांचा म्हणजे मॉडेल्सचा उपयोग अधिक होतो. पण चांगली मॉडेल्स आपल्याकडे अजून उपलब्ध नाहीत व जी आहेत ती सध्या महागही आहेत.

ही सर्वच साधने उपयोगाची. पण साधने ही अखेर केवळ साधनेच असतात. त्यांचा परिणामकारक उपयोग करून घेणे शेवटी शिक्षकाच्याच कौशल्यावर अवलंबून असते.

माहिती पोहोचविण्याच्या दृष्टीने व्याख्यानेही आवश्यक असतात. पण व्याख्याने, भाषणे हाही काहीसा एकेरी वाहतुकीचाच प्रकार. विषय शिक्षार्थीपर्यंत नीट पोचायचा तर वरील सर्व साधनांच्या जोडीला शिक्षकाने शिक्षार्थींशी व्यक्तिशः व गटशः चर्चा करणे, संभाषण करणे, मुख्य म्हणजे शिक्षकाने शिक्षार्थींचे म्हणणे व विचार ऐकून घेणे अतिशय महत्त्वाचे आहे. तरच शिक्षार्थींच्या वैयक्तिक शंका, समस्या, अडचणी व गरजा शिक्षकाच्या ध्यानात येतील. तसेच आपण शिकविले त्यापैकी मुलांपर्यंत नेमके काय व किती प्रमाणात पोहोचले ह्याचा अंदाज शिक्षकाला येईल. नुसती व्याख्यानबाजी आणि जोडीला नुसती श्रवणभक्ती यांचा शिक्षक आणि शिक्षार्थी दोघांनाही लाभ होत नाही ह्याचे अखंड भान शिक्षकाला पाहिजे.

लैंगिक शिक्षण परिणामकारकारक करायचे असेल तर ह्या अतिशय महत्त्वाच्या आणि तितक्याच नाजूक विषयावर अतिशय जबाबदारीने त्या विषयाचे सर्वस्पर्शित्व लक्षात घेऊन काम करणे आवश्यक आहे.

**फॅमिलीप्लॅनिंग असोसिएशन ऑव्ह इंडिया (पुणे शाखा),**
**१०८२/१ गणेशखिंड रस्ता, पुणे ४११ ०१६**

(या लेखाला पूरक म्हणून दोन परिशिष्टे अशोक रा. केळकर यांनी लेखकद्वयाच्या मदतीने तयार केली आहेत तीही पहावी. - संपादक)

परिशिष्ट १

# कामजीवनशिक्षणासाठी उपयुक्त परिभाषा

अशोक रा. केळकर

प्रथम इंग्रजी पारिभाषिक संज्ञा (केवळ तज्ज्ञांच्या वापरात अधिक येणारी संज्ञा वेगळी असल्यास ती क्रमाने नंतर दिलेली आहे), नंतर कंसात कधीकधी सामान्य बोलभाषेतील संज्ञा (उपयुक्त वाटल्यास), नंतर मराठी पारिभाषिक संज्ञा (केवळ तज्ज्ञांच्या वापरात अधिक येणारी संज्ञा वेगळी असल्यास ती क्रमाने नंतर दिलेली आहे), नंतर कंसात कधी कधी सामान्य बोलभाषेतील संज्ञा (उपयुक्त वाटल्यास)– असा प्रत्येक नोंदीमधील क्रम आहे. नोंदी वर्णानुक्रमे दिल्या आहेत. तुलना उपयुक्त वाटली तिथे 'तुळा :' असा निर्देश आहे. काही नोंदी या पोटनोंदी म्हणून दिल्या आहेत.

प्रत्येक संज्ञा पुरी दिली आहे. कधी कधी बोलण्यांच्या ओघात काहींचा संक्षेप होऊ शकतो- उदाहरणार्थ sexual intercourse ऐवजी केवळ intercourse, पुरूषाचे इंद्रिय ऐवजी केवळ इंद्रिय, penile penetration ऐवजी केवळ penetration.

ज्या संज्ञांना विशेष भावनिक अर्थवलये आहेत त्यांच्या पुढे तारकाचिन्ह * दिलेले आहे. अशा संज्ञांचा उपयोग जपून करावा, अर्थवलये नको ती असल्यास त्यांचा उपयोग अजिबात टाळावा हे उत्तम, उदा. शुक्रजंतू नको, शुक्राणू ठीक; male menopause नको male climacteric हीच संज्ञा ठीक .

abortion (miscarriage) गर्भपात (वाखा)

acne (facial pimples) तारुण्यपिटिका (मुरूम)

age (life stage) वयोमान, अवस्था. तुळा : prenatal stage

infancy (birth to 1.5 years) अर्भकावस्था (तान्हेपण)

childhood (1.5 to 6 years) बाल्यावस्था, शैशव (लहानपण, मूलपण, लहान मूल अवस्था)

preadolescence (late childhood, 6 to 12.5 years) किशोरावस्था (मोठे मूल अवस्था, पोरवय)

adolescence (12.5 to 18 years) पौगंड, कौमार्य–१ (आडवय) तुळा : virginity

youth, young adulthood (18 to 40 years) युवावस्था, तारुण्य
(तरुणपण, जवानी)
middle age, mature adulthood (40 to 60 years) मध्यम वय
(ऐन उमेदीचा काळ)
old age, late adulthood, senescence (more than 60 years)
वृद्धावस्था (उतार वय, म्हातारपण)
adulthood (more than 18 years) प्रौढावस्था (थोरवय)

– group वयोगट

animal-like प्राणिसुलभ (पाशवी*)

anus गुदद्वार (गांड*). तुळा : rectum

attitude अभिवृत्ती. तुळा : tendency
negative a. नकारात्मक अभिवृत्ती
positive a. भावात्मक अभिवृत्ती (विधायक वृत्ती)

autoeroticism स्वयंगत काम

behaviour वर्तन (वागणूक)

– pattern वर्तन-आकृतिबंध (वागणुकीचे वळण)

behavioural deviance वर्तन-विकृती. तुळा : physical abnormality

belief विश्वास
unsupported shared belief (superstition* myth* )
निराधार प्रचलित विश्वास (अंधविश्वास, अपसमज)

birth canal प्रसूति-मार्ग. तुळा : vagina

bisexual उभयलिंगी. तुळा : heterosexual, homosexual

body image देहप्रतिमा

breasts (mammae) स्तन (थाने, छाती)

caressing गोंजारणे, कुरवाळणे

case प्रकरण, व्यष्टी

– study प्रकरण-चर्चा, प्रकरण-अभ्यास, व्यष्टि-चिकित्सा

celibacy ब्रह्मचर्य. तुळा : sexual continence

cervix गर्भाशयमुख, गर्भाशयग्रीवा

childcare, child-rearing बालसंगोपन. तुळा : prenatal care

chromosomes गुणसूत्रे. तुळा : genes

cleanliness क्लेन्लिनेस - स्वच्छताप्रेम, स्वच्छता

clitoris शिश्निका, योनिलिंग (दाणा)

coercion जबरदस्ती. तुळा : compulsion, force
cohabitation लैंगिक सहवास, दांपत्यभावसहवास
communication संज्ञापन (बोलणेचालणे, संपर्क साधणे)
— feedback संज्ञापन-प्रतिपोषण (बोलून घेतलेला पडताळा)
compulsion सक्ती. तुळा : coercion, force
conception, fertilization गर्भधारण, बीजफलन (गर्भ राहणे)
confusion in thought/emotion वैचारिक/भावनिक गोंधळ/व्यामोह
consent संमती
age of c. संमतिवय
contraception गर्भनिरोध, संततिप्रतिबंध
courtship (wooing) विवाहानुनय, प्रणयाराधन
delicate नाजूक
delivery (confinement, childbirth) प्रसूती, अपत्यजन्म (बाळंतपण)
dependence पराधीनता. तुळा : human life cycle
diagram आकृति. तुळा : picture
double moral standard नैतिक पक्षपात, दुहेरी नैतिक निकष
education शिक्षण. तुळा : training
formal e. औपचारिक शिक्षण
informal e. अनौपचारिक शिक्षण
nonformal e. निम-औपचारिक शिक्षण
embracing (hugging) आलिंगन (कवटाळणे)
emotional disturbance भावनिक विचलन, भावनिक विक्षोभ
– health भावनिक स्वास्थ्य
– involvement भावनिक गुंतणूक
– shock भावनिक धक्का
– trauma भावनिक आघात
endocrine glands अंतःस्रावी ग्रंथी. तुळा : hormones
endometrium (uterus lining) गर्भाशयाचे अस्तर
enduring स्थायी. तुळा : transient
erection (of clitoris/nipple) (शिश्निकेचे/स्तनाग्राचे) उत्थापन
experience अनुभव. तुळा : exposure
exposure प्रभावी अनुभव, अनावृत्ती. तुळा : experience
expression 1 आविष्कार (वाट फुटणे)

2 अभिव्यक्ती (वाट काढणे)
Fallopian tubes (tubes) स्त्रीबीजवाहिनी
family planning, planned parenthood कुटुंबनियोजन, संततिनियमन
– welfare कुटुंबकल्याण, तुळा : child care, family planning, old age care, prenatal care
female 1 स्त्रीलिंगी
2 मादी
– sterility स्त्रीतील जनन-अक्षमता, वंध्यत्व (वांझपणा)
feminine स्त्रीसुलभ, स्त्रीयोग्य
feminism स्त्रीवाद, स्त्रीमुक्ती. तुळा : sexism
fertility फलवत्ता. तुळा : sexual capacity, sterility
force बळजबरी, बळजोरी. तुळा : compulsion, coercion
foreskin, prepuce शिश्नाग्र-आच्छादन
– removal (circumcision) सुंता
frigidity (female incapacity for orgasm) स्त्रीतील रति-अक्षमता. तुळा : sexual capacity
gender 1 पहा : sex 1
2 पहा : sex role
genes गुणवाहक. तुळा : chromosomes
genital 1 जननसंबंधी
2 पहा : sex organ
guardian पालक. तुळा : ward, parent
guardianship पालकत्व
gynaecologist स्त्रीरोगतज्ज्ञ
hair केस
body h. लोम (अंगावरचे केस)
face h. श्मश्रू (दाढीमिशांचे केस)
head h. केश (डोक्याचे केस)
pubic h. षष्प (शेटे*)
heredity आनुवंशिकता
heterosexual भिन्नलिंगी. तुळा : bisexual, homosexual
homosexual समलिंगी. तुळा & bisexual, heterosexual
hormones अंतःस्राव. तुळा : endocrine glands

– imbalance अंतःस्राव-असंतुलन
human life cycle मानवी जीवनचक्र. तुळा : dependence, independence, interdependence
hymen योनिपटल
defloration योनिपटलभंग, (कौमार्यभंग)
identity, selfhood स्वत्व
illicit sex अगम्यगमन
unconventional i. s. अमान्य लैंगिक संबंध
legally i. s. अवैध लैंगिक संबंध
morally i. s. अनैतिक लैंगिक संबंध
imaginativeness कल्पकता
impotence (male incapacity for orgasm) नपुंसकत्व. तुळा : sexual capacity
impulsion (uncontrollable stage in ejaculation, urination, sneeze etc.) वेग (आवेग)
incest कौटुंबिक अगम्यगमन
indecent/obscene/gesture/picture/words
गलिच्छ/बीभत्स/अश्लील हावभाव/चित्र/शब्द
– exposure असभ्य वस्त्रवर्जन. तुळा : nudity
independence स्वाधीनता. तुळा : human life cylcle
inhibition निरोधन. तुळा : stimulation
instinct सहजप्रेरणा
integrity (base for conscious choice) अधिष्ठान
interdependence परस्पर-अधीनता. तुळा : human life cycle
intimacy जवळीक, सलगी तुळा : mutuality
unwanted i.अवांछित जवळीक, लगट.
kissing, osculation चुंबन (मुका*, पापा*)
labour प्रसवावस्था. तुळा : delivery
— pains प्रसववेदना (वेणा, बाळंतपणाच्या कळा)
learner शिक्षार्थी. तुळा : student
love, affection प्रेम. प्रीती. तुळा : sexual love, pair-bonding
lower abdomen, hypogastrium निम्न उदर/ओटीपोट. तुळा : mons pubis, pelvis

male 1 पुलिंगी
2 नर
— climacteric, male menopause* (male change of life) पुरुषातील वीर्य सिंचन-संकोच
— sterility पुरुषातील जनन-अक्षमता
marriage विवाह (लग्न)
— bond विवाह-बंधन (लग्न-बंधन)
— counselling 1 विवाहसंबंधी सल्ला
2 वैवाहिक जीवनासंबंधीचा सल्ला
married life वैवाहिक जीवन, दांपत्य-जीवन
masculine पुरुषसुलभ, पुरुषयोग्य
massage मर्दन, मालीश
masturbation, (manual-genital stimulation of self or partner) - हस्तमैथुन
medical termination of pregnancy वैद्यकीय गर्भसमाप्ती, वैद्यकीय गर्भपात
menarche, female puberty ऋतुप्राप्ति (न्हाण येणे, पदर येणे)
तुळा : puberty
menopause, female climacteric ऋतुलोप (मासिक पाळी बंद होणे, विटाळ जाणे*)
menstrual blood शोणित (मासिक पाळीतून गेलेले रक्त)
menstruation, menses (monthly courses, monthly periods) ऋतुस्राव, आर्तव (मासिक पाळी, विटाळ*)
modesty (bashfulness) विनय, शालीनता, सलज्जता. तुळा : sexual molestation
mons pubis, mons veneris (mount of Venus) उपस्थ गोलाई
mood भावस्थिती (मूड)
mutuality पारस्परिकता. तुळा : intimacy
newborn, neonate नवजात अर्भक (नुकतेच जन्मलेले मूल)
normal प्रकृतिसिद्ध. तुळा : behavioural deviance, physical abnormality
`nubility (readiness for mutuality and orgasm) रति-सज्जता. तुळा : puberty

nudity विवस्त्रता. तुळा : indecent exposure
obstretician प्रसूतितज्ज्ञ
old age care वृद्धांची काळजी
orgasm (coming) रतिक्षोभ. तुळा : frigidity, impotence, nubility, sexual potency
ovaries स्त्रीबीजग्रंथी
ovulation स्त्रीबीजधारणा (स्त्रीबीज पक्व होणे)
ovum, female gamete स्त्रीबीज
pair-bonding रतिबंधन, रतिमोह
calf-love (child to child) पोरवय-प्रेम
crush (child to adult) प्रौढलक्षी आडवय-प्रेम
falling in love (adult to adult) प्रेमविद्ध होणे (मन जडणे)
infatuation समवयस्क आडवय-प्रेम
parent जनक. तुळा : guardian
parenthood जनकत्व तुळा : family planning
responsible p. जबाबदार जनकत्व
peer group समवयस्क गट
pelvis (hip) कटिप्रदेश. बस्तिदेश. तुळा : lower abdomen, mons pubis, urinary bladder
penile erection शिश्न-उत्थापन (इंद्रिय उठणे)
penile penetration शिश्न-प्रवेश, शिश्न-निवेश
penis शिश्न, लिंग (पुरुषाचे इंद्रिय, लंड). तुळा : sex 1
person व्यक्ती
major p. सज्ञान व्यक्ती
minor p. अज्ञान व्यक्ती
personal dignity व्यक्ति-प्रतिष्ठा, व्यक्तित्व
personality व्यक्तिमत्व
physical abnormality शारीरिक व्यंग
- attraction शारीरिक आकर्षण (शारीरिक ओढ)
- pleasure शरीरसुख
- union (sex 2, love making) शारीरिक मिलन
*pictorial diagram चित्राकृती
picture चित्र. तुळा : diagram

placenta जरायू (वार)
afterbirth वार पडणे
pleasurable उल्हसित
pornography कामोत्तेजक प्रदर्शन (अश्लील चित्रण)
cinematic p. (blue film) कामोत्तेजक चित्रपट
literary p. कामोत्तेजक वाङ्मय
pictorial p. कामोत्तेजक चित्रमूर्ती
theatrical p. कामोत्तेजक रंगप्रस्तुती
position of intercourse संभोगासन
pregnancy (gravidity) गर्भिणीदशा (गरोदरपण, गर्भारपण)
prenatal care, antenatae care गर्भिणी-गर्भ-संगोपन
prenatal stage, gestation stage गर्भावस्था
zygote (conception to 1 week) फलित बीजाणु, आरंभिक पिंड
blastocyte (1 week to 3 weeks) आकारित बीजाणु, आकारित पिंड
embryo (3 to 12 weeks) पिंडगर्भ
foetus (12 weeks to birth) शिशुगर्भ
primipara (primi) प्रथमगर्भिणी (पहिलटकरीण)
privacy खाजगीपणा, प्रच्छन्नता
prostitution (sale of sexual service) वेश्याव्यवसाय
male p. पुरुषवेश्याव्यवसाय (ठोलेगिरी)
procreation, reproduction जनन, प्रजनन, प्रजोत्पादन
prostrate gland पुरःस्थ ग्रंथी
puberty (readiness for conception) जनन-सज्जता. तुळा : menarche, nubility, virginity
rape बलात्कार, जबरी संभोग
rectum गुद. तुळा : anus
routine परिपाठ
scrotum वृषणकोश (आंड). तुळा : testicles
self-respect, self-esteem आत्मसन्मान (स्वाभिमान)
semen, semen virile, sperm1, शुक्र, वीर्य, रेत (धातू). तुळा : spermatozoon
seminal ejaculation शुक्रसिंचन, वीर्यपतन, रेतसिंचन (वीर्यनाश*

धातुस्खलन*) तुळा : orgasm
retrograde s.e. (dry come) परावर्ती शुक्रस्राव, उध्वरितगमन*
-- emission शुक्रस्राव, वीर्यस्राव, रेतस्खलन
sense of guilt अपराधी भाव
-- inadequacy, sense of inferiority न्यून भाव
-- insecurity असुरक्षित भाव
-- security सुरक्षित भाव
-- shame लज्जित भाव
sensible विवेकी, विचारी (समंजस)
sensitive संवेदनाक्षम, (हळवा)
sensual pleasure विषयसुख
pleasure of touch स्पर्शसुख
visual pleasure दृष्टिसुख
sensuous pleasure ऐंद्रिय सुख
sex 1 = gender 1 लिंग १ तुळा : sex role, sexual difference
2 पहा : physical union
3 पहा : sex drive
4 पहा : sex organ
5 पहा : sex relation
— act लैंगिक कर्म
— change लिंगांतरण, लिंगपरिवर्तन
— drive, sexual drive कामप्रेरणा, काम-१, रति १. तुळा : sexual love
— education लैंगिक शिक्षण
— life कामजीवन, रतिजीवन, लैंगिक जीवन
— object उपभोग्य वस्तू
— organ, genital 2 जननेंद्रिय
— relation लैंगिक संबंध, स्त्रीपुरुष-संबंध
— role, gender 2 लैंगिक भूमिका, लिंगनियत सामाजिक स्थान. तुळा : sex 1
sexism लैंगिक पक्षपात
sexual acceptance कामार्थ स्वीकार, रत्यर्थ स्वीकार

— aggression लैंगिक आक्रमकता
— arousal कामोत्तेजन
— attraction लैंगिक आकर्षण (लैंगिक ओढ)
— capacity लैंगिक क्षमता. तूळा : fertility, frigldity, impotence, sexual potency, sterulity)
— continence लैंगिक संयमन. तुळा : celibacy impulsion
— counselling कामसंबंधी सल्ला
— cruelty लैंगिक क्रौर्य, लैंगिक निर्दयता
— curiosity लैंगिक कुतूहल
— deceit लैंगिक फसवणूक
— demand कामार्थ मागणी, रत्यर्थ मागणी
— desire, libido (lust*) कामेच्छा, कामवासना*
— difference लिंगभेद
— disorder लेंगिक विकार. तुळा : sexually transmitted disease
— drive पहा : sex drive
— excitement कामोद्दीपन
— graffiti लैंगिक भित्तिवाङ्मय
— harassment लैंगिक जाच
— health 1 कामस्वास्थ्य, लैंगिक स्वास्थ्य,
2 लैंगिक निकोपपणा, लैंगिक आरोग्य, लैंगिक निरोगीपणा, लैंगिक निरामयता. तुळा : sexual disorer
— hunger लैंगिक भूक, लैंगिक तृष्णा
— inadequacy लैंगिक न्यून
— innocence लैंगिक निरागसता, मुग्धता
— intercourse, copulation, coitus मैथुन, लैंगिक समागम, संभोग (जुगणे)
anal s.i. गुदमैथुन
genital s.i. योनिमैथुन
oral s.i. मुखमैथुन
invitation कामार्थ साद, रत्यर्थ साद
jealousy काम-मत्सर, रति-मत्सर
love, eros काम-२, रति-२, प्रणय तुळा : sex drive

— molestation विनयभंग. तुळा : modesty
— need लैंगिक गरज
— partner सहभोगी
— play रतिक्रीडा, कामक्रीडा
afterplay रत्युत्तर क्रीडा, कामोत्तर क्रीडा
foreplay रतिपूर्व क्रीडा, कामपूर्व क्रीडा
— potency (capacity for orgasm) रतिक्षमता. तुळा : sexual capacity
— pride कामसंबंधी अहंकार
— promiscuity कामसंबंधी स्वैराचार
— refusal कामार्थ नकार, रत्यर्थ- नकार
— resolution कामशमन
— response कामार्थ प्रतिसाद, रत्यर्थप्रतिसाद
— satisfaction कामपूर्ती
— segregation लैंगिक विलग्नीकरण
— stimulant कामोत्तेजक
— torment लैंगिक छळणूक
— urge लैंगिक उद्युक्ती
— violence लैंगिक हिंसकता

sexuality लैंगिक भान, लैंगिकता

sexually jealous anger 1 काम-मत्सरी क्रोध
2 मान (मत्सरी रुसवा)
— mixed company लैंगिकदृष्ट्या संमिश्र समाज (संमिश्र समाज)
— transmitted disease,venereal disease* लैंगिकदृष्ट्या संसर्गजन्य रोग (गुप्त रोग*, लैंगिक रोग) तुळा : sexual disorder

spermatozoon, sperm 2, male gamete पुरुषबीज, शुक्राणू, शुक्रजंतू* तुळा : semen virile
— spontaneity उस्फूर्तता, सहजस्फूर्तता
— stereotype सांकेतिक प्रतिमा (साचेबंद प्रतिमा)
— sterility जनन-अक्षमता. तुळा : female sterility, impotence, fertility

sterilization जनन-अक्षम करणे (मुले बंद करण्याची शस्त्रक्रिया)

stimulation उत्तेजन. तुळा : inhibition
stress ताण. तुळा : tension
student (learner in formal education) विद्यार्थी. तुळा : learner
taboo, tabu 1 निषिद्धता
2 निषिद्ध
tendency प्रवृत्ती. तुळा : attitude
tenderness कोमलभाव
tension तणाव, तुळा : stress
testicles, testes (balls) वृषण (अंडुकल्या). तुळा : scrotum
trainee प्रशिक्षार्थी
training प्रशिक्षण. तुळा : education
transient (passing) अस्थायी, अल्पकालीन (क्षणिक). तुळा : enduring
transsexual लिंगांतरणकांक्षी
tubal ligation (tube-tying) स्त्रीबीजवाहिनी-निबंधन (स्त्रीबीज-वाहिनी बांधणे)
tubectomy (tube-cutting) स्त्रीबीजवाहिनी छेदन (स्त्रीबीजवाहिनी कापणे)
umbilical cord नाल (नाळ)
understanding 1 (process and content) आकलन, समज, समजूत
2 (capacity) समंजसपणा, समजूतदारपणा
undesirable 1 अनिष्ट, अवांछनीय. तुळा : unwarnted
2 अनुचित, अमान्य. तुळा : illicit sex
— company अनिष्ट संगत
— publicity अनुचित प्रसिद्धी
unwanted child अवांछित अपत्य
— conception अवांछित गर्भधारणा
— intimacy अवांछित जवळीक, लगट, तुळा : mutuality
— pregnancy अवांछित गर्भिणीदशा (नको असलेले गरोदरपण)
urethra मूत्रवाहिनी
— urinary bladder मूत्राशय, बस्ती (मूत्राची पिशवी)
— meatus मूत्रद्वार
urogenital system मूत्रयन-जनन-व्यवस्था

uterus (womb) गर्भाशय (गर्भाची पिशवी)
— removal, hysterectomy गर्भाशय-प्रतिघात
vagina योनिमार्ग. तुळा : vulva, birth canal
vaginal discharge योनिस्राव (अंगावर जाणे)
morbid v.d. अनिष्ट योनिस्राव, प्रदर
lubrication योनिसलिलस्राव
vasa deferentia, spermatic cords शुक्रवाहिनी, वीर्यवाहिनी
vasectomy शुक्रवाहिनी-छेदन (नसबंदी)
virginity कौमार्य-२. तुळा : puberty, age : adolescence
female virginity स्त्रीचे कौमार्य
male virginity पुरुषाचे कौमार्य
voice change, breaking of voice स्वरभंग ( मुलग्याचा आवाज फुटणे, मुलीचा आवाज बदलणे)
vulva योनिमुख, भग. तुळा : vagina
labia majora मोठा भगोष्ठ, बृहद्भगोष्ठ
labia minora लहान भगोष्ठ, लघुभगोष्ठ
ward पाल्य. तुळा : guardian
wet dream, nocturnal seminal emissions, erotic orgasmic dream स्वप्नावस्था

**७ धनंजय, ७५९/८३ भांडारकर रस्ता गल्ली, पुणे ४११००४**



परिशिष्ट २

# लोकशिक्षणाची दृष्टिगम्य माध्यमे : काही विचार

अशोक रा. केळकर

[प्रस्तुत टिपण जरी लैंगिक शिक्षणाच्या संदर्भात तयार केलेले असले तरी त्यामधले विचार जिथेजिथे दृश्य साधने वापरायला वाव आहे अशा लोकशिक्षणाच्या कोणत्याही क्षेत्रातील लोकांना उपयोगी पडावेत.]

तसे म्हटले तर लैंगिक शिक्षण प्रत्यक्ष लैंगिक वर्तनाच्या माध्यमातून चुकतमाकत होतच असते. पण एक तर तेवढे शिक्षण पुरत नाही. शिवाय चुकतमाकत शिकण्यात जशी गंमत असते तसा धोकाही असतो. म्हणून तर जोडीला लैंगिक बोधाचे माध्यम शिक्षणासाठी वापरावे लागते. (अर्थात् गंमत न घालवता!)

शैक्षणिक बोध हा तोंडी किंवा लेखी असा शब्दगम्य बोध असेल किंवा चित्ररूपाने किंवा आकृतिरूपाने घेतलेला दृश्य किंवा दृष्टिगम्य बोध असेल किंवा सुर-तालरूपाने किंवा ध्वनि-अनुकरणरूपाने घेतलेला श्रव्य किंवा श्रुतिगम्य बोध असेल. ही तीन शैक्षणिक माध्यमे सुटीसुटी वापरता येतील (उदाहरणार्थ मुद्रित मजकूर किंवा शब्दहीन मूर्ती किंवा वादन) किंवा मिसळून वापरता येतील (उदाहरणार्थ स-चित्र मजकूर किंवा स-शब्द चित्र किंवा स-शब्द ध्वनिमुद्रण किंवा स-शब्द ध्वनिचित्रण).

या ठिकाणी फक्त लोकशिक्षणाच्या दृष्टिगम्य माध्यमाचा विचार केला आहे. हेतू हा की लैंगिक शिक्षण क्षेत्रातले तज्ज्ञ किंवा प्रशिक्षित लोकशिक्षक यांनी उपलब्ध सामग्रीतून निवड करायची किंवा नवी साधने बनवायची ती कामे डोळसपणाने व्हावीत. कदाचित् अशी साधने निर्मिणाऱ्या कलाकारांनाही या विचारांचा उपयोग व्हावा.

यासाठी प्रथम या शिक्षणमाध्यमाच्या शक्यता आणि मर्यादा कोणत्या आहेत हे अवगत करून घ्यायला पाहिजे आणि मग त्यांची सांगड शैक्षणिक आशय आणि उद्दिष्ट यांच्याशी कशी घालायची हे पहायला पाहिजे.

पुस्तक, भित्तिपत्र (पोस्टर), स्थिर किंवा चल प्रकाशचित्रण (फोटोग्राफी), स्थिर किंवा चल प्रतिरूपण (मॉडेलिंग), विविध प्रकारचे प्रक्षेपक (प्रोजेक्टर) इत्यादी म्हणजे केवळ तंत्रविद्येने (टेक्नॉलजी) उपलब्ध केलेली साधने आहेत. त्यांची डोळस योजना महत्त्वाची असते. प्रसंगी जे काम फळ्यावर खडूने काढलेल्या चित्राने होईल





अनुक्रमणिका

ते काम खर्चिक रीतीने सिद्ध केलेली प्रक्षेपित पारदर्शिका (प्रोजेक्टेड ट्रान्स्परन्सी) करू शकेलच याचा भरवसा नाही. साधनांच्या शैक्षणिक योग्यायोग्यतेचा विचार आपण मुख्यतः करणार आहोत. व्यावहारिक अडचणी (उदाहरणार्थ, उपलब्धता, महागडेपणा, वाहतुकीच्या किंवा साठवणीच्या दृष्टीने अवजडपणा) आपण सध्या बाजूला ठेवू.

दृष्टिगम्य शैक्षणिक **माध्यमाच्या शक्यता** लक्षात घ्यायच्या तर त्या पुढीलप्रमाणे सांगता येतील —

(१) दृश्यरूपाला मिती (डायमेन्शन) असते आणि दिशा (डायरेक्शन) असते. म्हणजे दृश्यरूप हे एक मितीचे (रेषारूपी), दोन मितींचे (पृष्ठरूपी), किंवा तीन मितींचे (घन-आकाश-रूपी) असू शकेल. रेषा असली तर तिला एकच दिशा (एकमार्गी) किंवा दोन दिशा (दुतोंडी) असतील. असेच भेद द्विमिती किंवा त्रिमिती रूपांच्या बाबतीतही दिसतात. बाणाकृतींचा किंवा वृक्षाकृतींचा उपयोग पुष्कळदा एकदिशा किंवा द्वि-दिशा रूप सुचवण्यासाठी करण्यात येतो. उदाहरणार्थ, समारंभाच्या जागी जाण्याचा रस्ता, एका दांपत्याचा वंशविस्तार आणि त्यातील वडीलकीचा क्रम.

(२) यामधून एक आकार उपस्थित होतो. त्यामध्ये डोळ्यात भरणारी आकृती (फिगर) आणि तिच्या सभोवतालची भूमी (ग्राउंड) असे अंतर आपल्याला जाणवते. या सगळ्यांतून आपली नजर फिरते, घरंगळते, अडकते. काही भाग आपले अवधान ओढून घेतात, तर काही अवधानातून निसटतात. या नजरेला गती आणि दिशा प्राप्त होते. आकाराबरोबर (शेप) आकारमानाचाही (साइझ) एक स्वतंत्र परिणाम असतो.

(३) दृश्यरूपाला काही स्पर्शगुणही असतो. रेषा नितळ किंवा भरड असते. पृष्ठाला विविध प्रकारचा पोत (टेक्स्चर)असतो. घन आणि आकाश यांमध्ये दाटी असेल किंवा विरळपणा असेल.

(४) दृश्यरूपाला स्थलावकाशातील तीन मितींच्या खेरीज कालावकाशाची मितीही उपस्थित होऊ शकते. म्हणजे दृश्यरूप स्थिर असते किंवा चल असते. चल दृश्यरुपात जागच्या जागेवर परिवर्तन असेल किंवा स्थलांतर असेल. स्थिर दृश्यरूपाच्या मदतीने कालमिती दाखवण्यासाठी विशेष क्लुप्ती वा संकेत योजावे लागतील.

(५) सरतेशेवटी दृश्यरूपाला रंग असतो. ते रूप कृष्णधवल असेल, एकरंगी असेल (नुसते कृष्ण, धवल, निळे, गेरूच्या रंगाचे इत्यादी), किंवा अनेकरंगी असेल. रंगांच्या बरोबर रंगच्छटा (टोन) प्रेक्षकाचे लक्ष वेधून घेणारी

असेल. रंगच्छटेला तीन मिती असतात : उष्ण-शीत (लाल कडून जांभळ्याकडे), उजळ-काळपट (उदाहरणार्थ, पांढरा-करडा-काळा, गुलाबी-लाल-काळपट लाल), आणि गडद-फिकट (कृष्णधवल-पासून सगळ्यात दूर-सगळ्यात जवळ). कृष्णधवल दृश्यरूपाला अर्थातच रंगच्छटेची फक्त दुसरी मिती असते — आपण त्याला शेडिंग म्हणतो.

(६) दृश्यरूपाच्या जोडीला दृश्यरूपाच्या प्रदर्शनाचाही विचार करावा लागतो. किती अंतरावर, केवढ्या उजेडात, कोणत्या कोनातून प्रेक्षक त्या दृश्यरूपाकडे पाहतो आहे याची दखल घ्यावी लागते. दृश्यरूप केवळ प्रकाश परावर्तित करणारे आहे किंवा स्वयंप्रकाशी आहे (पडद्यावर उजेड पाडून दृश्यमान होणारे आहे) याचाही विचार करणे आहे.. दृश्यरूप प्रेक्षकाच्या डोळ्यासमोर किती सेकंद वा मिनिटे एका खेपेला राहणार आहे हे सुद्धा हिशोबात घ्यावे लागते.

दृष्टिगम्य शैक्षणिक **माध्यमाच्या मर्यादा** लक्षात घ्यायच्या याचा अर्थ माध्यमाची जणू 'भाषा' असते ती समजावून घ्यायची -

(१) दृष्टिगम्य बोध आणि शब्दगम्य बोध यात एक महत्त्वाचा फरक आहे. उगीच नाही चिनी भाषेत म्हण आहे की, एका चित्राने काम होते ते दहा शब्दांनी होत नाही. दृष्टिगम्य बोधाचे बलस्थान म्हणजे त्याची मूर्त (काँक्रीट) प्रदर्शनाची क्षमता. आताच आपण ज्या विविध शक्यता पाहिल्या, विशेषतः आकार, पोत, स्थिरचलभेद, आणि रंग-रंगच्छटा या पाहिल्या, त्यांच्यामधून घनताभास, आकृति-भूमि-भेद, पोताचा आभास, गतीचा आभास, रंगाचा आभास उत्पन्न करता येतो.

(२) याच्या उलट काही मर्यादिपर्यंत दृष्टिगम्य बोध हा शब्दगम्य बोधाशी स्पर्धाही करू शकतो. शब्दगम्य बोधाचे बलस्थान म्हणजे त्याची अपोद्धार (अब्स्ट्रॅक्शन) करण्याची, म्हणजे लक्षणीय-दुर्लक्षणीय भेद करून प्रस्तुत (रेलिव्हंट) असेल ते वेगळे काढून अप्रस्तुत वगळण्याची क्षमता. द्विमिती किंवा त्रिमिती, स्थिर किंवा चल चित्र हे मूर्त प्रदर्शनावर भर देते. उलट द्विमिती किंवा त्रिमिती, स्थिर किंवा चल आकृती (या ठिकाणी आकृती म्हणजे डायग्रॅम) अपोद्धारयुक्त (ॲब्स्ट्रॅक्ट) प्रदर्शनावर भर देते. मात्र कधीकधी चित्र हे आकृतीकडे झुकते (उदाहरणार्थ काड्यामोड्याची माणसे वा प्राणी वा परिसर), तेव्हा आपण त्याला चित्राकृती म्हणू.

(३) मूर्त प्रदर्शन आणि अपोद्धारयुक्त प्रदर्शन (काँक्रीट अँड ॲबस्ट्रॅक्ट रेप्रिझेंटेशन) यांच्याखेरीज तिसरीही एक क्षमता चित्राच्या ठिकाणी असते; ती म्हणजे व्यंजनेची क्षमता. चित्र जेवढे समूर्त तेवढी ही व्यंजनेतून संस्कार करण्याची क्षमता जास्त. चित्र अर्धप्रस्तुताची किंवा अप्रस्तुताची आठवण करून देऊ शकते, भावना

जागवू शकते, प्रेक्षकाला कृतीला प्रवृत्त करू शकते. चित्राचे आकारमान मोठे असल्यास जसा भव्यतेचा संस्कार होऊ शकतो तसा अवाढव्यतेचा किंवा भयप्रदतेचाही संस्कार होऊ शकतो.

(४) दृष्टिगम्य माध्यमाशी संभाव्य प्रेक्षक किती अभ्यस्त आहे, दृष्टिगम्य रूपाचे संकेत त्याच्या किती परिचयाचे आहेत, दृष्टिगम्य प्रदर्शनामधील व्यंजनेच्या क्लृप्ती तो ओळखू शकतो किंवा नाही अशा बाबींच्यावर त्या माध्यमाची परिणामकारकता अवलंबून असते. भारतामधील प्रेक्षक पुष्कळदा दृष्टिसाक्षर ('व्हिजुअली लिटरेट') नसतात, किंवा कधी दृष्टिसाक्षर जरूर असतात पण पारंपारिक चित्रशैलींच्या अंगाने. (उदाहरणार्थ, परिदर्शाबद्दलच्या (पर्स्पेक्टिव्ह) कल्पना, प्रकाशचित्र आणि 'हाती काढलेले चित्र' यांमधल्या फरकाची दखल घेणे, वास्तव आकारमानापेक्षा चित्राचे आकारमान जास्त किंवा कमी असणे - 'चित्राचे किंवा नकाशाचे स्केल'.) व्यंजनेच्या क्लृप्ती प्रेक्षक सहज ओळखू शकला (उदाहरणार्थ जाहिरातीतले छुपे कामोत्तेजन) तर त्यांची परिणामकारकता कमी किंवा नाहीशी होते; कधी तर प्रतिकूल परिणाम होऊ शकतो.

(५) आकृती किंवा चित्र भाषणाची जागा अवश्य घेऊ शकतात, पण संभाषणाची जागा घेऊ शकत नाहीत. ती 'मुकी' असतात.

माध्यमाच्या शक्यता आणि मर्यादा यांची सांगड शिक्षकाने शिक्षणाचा आशय (कायकाय शिकवायचे?) आणि उद्दिष्ट (कशाकशासाठी शिकवायचे?) यांच्याशी घालायची असते. म्हणजे शिक्षकाला त्या त्या शिक्षणक्रमाचा आशय आणि उद्दिष्ट यांची पुरेशी स्पष्ट पूर्वकल्पना असावी लागते. (अर्थात् एखादा कल्पक आणि रस घेऊन शिकवणारा शिक्षक शिकवता शिकवता पूर्वनियोजित आशय आणि उद्दिष्ट यांमध्ये भर घालून निर्मितिक्षमता दाखवतो हा भाग वेगळा.)

**शिक्षणाचा आशय** चार प्रकारचा असू शकतो -

(१) शिक्षणक्रमाच्या शेवटी शिक्षार्थीला वस्तुस्थितीचे अगोदरपेक्षा अधिक अचूक, नेमके, आणि पुरेसे विस्तृत ज्ञान व्हावे, त्याला नवनवीन प्रस्तुत तथ्ये (फॅक्ट्स्) अवगत व्हावी ही शैक्षणिक आशयाबद्दल एक महत्त्वाची अपेक्षा असते. उदाहरणार्थ, लैंगिक शिक्षणामध्ये : सहजी डोळ्याला न दिसलेली जननेंद्रिये कोणती आणि कशी, त्यांची कार्ये कोणती, लैंगिक व्यवहारात काय काय होऊ शकते इत्यादी.

(२) शिक्षणक्रमाच्या शेवटी शिक्षार्थीला वस्तुस्थितीचा अधिक मार्मिक अन्वयार्थ लागावा, कार्यकारण भाव उलगडावे, त्याला प्रस्तुत मर्मदृष्टी (इन्साइट्स्) प्राप्त व्हाव्या अशीही एक रास्त अपेक्षा असते. उदाहरणार्थ, लैंगिक शिक्षणामध्ये

ब्रम्हचर्य म्हणजेच जीवन, वीर्यनाश म्हणजे मृत्यू हा अपसमज दूर होणे, संततिनियमनाची शस्त्रक्रिया करुन घेतल्यावर स्त्रीपुरुषांच्या कामेच्छेवर त्याचा परिणाम होत नाही हे पटणे इत्यादी.

(३) शिक्षणक्रमाच्या शेवटी शिक्षार्थीच्या ग्राह्याग्राह्यविवेकावर विशिष्ट दिशेने संस्कार व्हावेत, त्याच्या विविध अभिवृत्तींना (ॲटिट्यूड्ज्) इष्ट वळण मिळावे ही काहीशी दुर्लक्षित पण महत्त्वाची अपेक्षा असते. उदाहरणार्थ, लैंगिक शिक्षणामध्ये : लैंगिक व्यवहार, किंबहुना समग्र कामजीवन हा एक निसर्गसुलभ आणि प्रसंगी सुभग व्यवहार असतो, तो मूलतः अपवित्र, कुरूप, माणसाला 'पशूच्या कोटीत ओढणारा' असा व्यवहार नाही, पुरुषाइतकीच स्त्रीची कामेच्छा महत्त्वाची आहे इत्यादी.

(४) शिक्षणक्रमाच्या शेवटी शिक्षार्थीच्या अंगी आणि मनीदेखील काही नैपुण्ये (स्किल्ज्) उपलब्ध होणे ही आशयाबद्दल महत्त्वाची अपेक्षा असते. उदाहरणार्थ, लैंगिक शिक्षणामध्ये : भिन्नलिंगी व्यक्तीमधील निखळ स्नेहभावना आणि कामाचे अस्तर असलेले आकर्षण यातला फरक ओळखणे, सहभोगी व्यक्तीची कामपूर्ती साधणे, निदान तिला पीडा वा तीव्र असमाधान होऊ न देणे, संततिप्रतिबंधाची साधने वापरणे इत्यादी.

शिक्षणाचा आशय ज्याप्रमाणे त्या त्या शिक्षणक्षेत्राशी आणि शिक्षणक्षेत्रामधल्या त्या त्या विशिष्ट शिक्षणक्रमाशी निगडित असतो त्याचप्रमाणे **शिक्षणाचे उद्दिष्ट** विशिष्ट शिक्षणक्षेत्राशी आणि शिक्षणक्रमाशी निगडित असते.

लैंगिक शिक्षणाचे उद्दिष्ट सामान्यतः सांगायचे तर कामजीवनाच्या शारीरिक, भावनिक, आणि सामाजिक पैलूंबद्दल लोकांत, विशेषतः वयात येणाऱ्या मुलामुलींमध्ये आणि त्यांच्या पालकांमध्ये, सुजाण आणि निकोप वृत्तीची जोपासना करणे, सहजप्रवृत्तीचा आविष्कार आणि अभिव्यक्ती योग्य दिशेने आणि परिणामकारक रीतीने व्हावा याची पूर्वतयारी करणे आणि व्यावहारिक अडचणी व धोके कसे टाळता किंवा उपस्थित झाल्यावर निवारता येतील याची जाणीव देणे ही आहेत. विशिष्ट शिक्षणक्रमाचे तपशीलवार उद्दिष्ट तो कोणत्या शिक्षार्थीसाठी आखला आहे यावर अवलंबून राहील. त्यांचा वयोगट (बाल, किशोर, तरुण, प्रौढ, वृद्ध), लिंगभेद, शैक्षणिक पातळी आणि समज, सांस्कृतिक संचित आणि सामाजिक परिस्थिती यांना अनुसरून उद्दिष्ट आणि शैक्षणिक आशय यांबद्दलचा तपशील ठरवावा लागेल.

यासाठी मुख्यतः शब्दगम्य माध्यम, विशेषतः तोंडी संभाषण, वापरावे लागेल. मात्र याला दृष्टिगम्य माध्यमाची, विशेषतः स-शब्द चित्र, चित्राकृती, किंवा

आकृती यांची जरूर तिथे जोड द्यावी लागेल हेही तितकेच खरे. लैंगिक शिक्षणाचा आशय पाहिला तर त्यातल्या त्यात लैंगिक तथ्ये आणि नैपुण्ये यांचे माध्यम म्हणून दृष्टिगम्य साधनांचे महत्त्व आहे. लैंगिक मर्मदृष्टी आणि अभिवृत्ती शिक्षार्थीपर्यंत पोचवताना दृष्टिगम्य साधनांचे कार्य असलेच तर दुय्यम आहे.

एका बाजूला दृष्टिगम्य माध्यमाच्या शक्यता आणि मर्यादा आणि दुसऱ्या बाजूला शिक्षणाचा आशय आणि उद्दिष्ट या दोन्हींची सांगड ती साधने निर्मिणारा कलाकार आणि त्याला आपली गरज समजावून सांगणारा आणि प्रसंगी मार्गदर्शन करणारा शिक्षणतज्ज्ञ (किंवा शिक्षक) हे दोघेजण (कधी एकच व्यक्ती कलाकार व शिकवणारा या दोन्ही भूमिका पार पाडीत असेल) कशी काय घालतात, हे आता आपण पहायचे. या सांगड घालण्यालाच आपण **दृष्टिगम्य माध्यमाचे कलातंत्र** (टेक्नीक) म्हणू. या ठिकाणी केवळ तंत्रविद्येचे काम नाही, तेथे पाहिजे जातीचा कलागुण.

या शैक्षणिक कलातंत्राचा विचार करण्यासाठी आपण काही आकृती (एक आणि दोन), काही चित्राकृती (एक आणि दोन), आणि काही चित्रे (एक आणि दोन ) यांचे निरीक्षण करू आणि यामधून काही निकष आपल्या हाती येतात का ते पाहू. असे निकष हाती आले तर व्यावहारिक अडचणींना तोंड देताना कुठे आणि कितपत तडजोड करायची ह्याचाही अधिक डोळस विवेक करता येईल.

आकृती एक मध्ये जास्तीत जास्त अपोद्धार आहे, म्हणजे ती अधिक अमूर्त अशा वस्तुस्थितीचे मूर्त चित्रण करू पहात आहे. आकृतीत पाच बिंदू आहेत, प्रत्येक बिंदू म्हणजे वस्तुस्थितीमधला महत्त्वाचा आणि म्हणून लक्षणीय असा एकएक घटक. प्रत्येक बाण आपल्याला कारणाकडून परिणामाकडे घेऊन जात आहे; मात्र या कार्यकारणभावाच्या साखळीत आरंभबिंदू असा कोणताच नाही हे स्पष्ट होते, म्हणजेच ही साखळी चक्राकार आहे. शब्दगम्य बोधाची मदत मोकळेपणाने घेतली आहे. आकृती समजल्यावर हे चक्र कुठेकुठे तोडता येईल याबद्दल शिक्षार्थींच्या मध्ये चर्चेला चालना देता येईल. म्हणजे दृष्टिगम्य बोधामार्फत मर्मदृष्टी जागवता येईल.

आकृती दोन तुलनेने अधिक मूर्त आहे. गणितगम्य बोधाची मदत घेऊन एक वक्र (कर्व्ह) काटकोनात असलेल्या दोन अक्षांशी (ॲक्सीज) नाते जोडत आहे. त्यामुळे काळाचे भान तर मिळतेच, पण एक अवस्थाक्रम स्पष्ट होतो. मात्र ज्या मूळ मोजमापांवर ही आकृती आधारलेली आहे ती मोजमापे रतिभावाची तीव्रता आणि रतिक्रियेचा कालक्रम या समावेशक नावांखाली झाकून टाकली आहेत. रक्तदाब, नाडीचे ठोके, श्वासाची गती, स्नायुपेशींचा ताण, व्यक्तीव्यक्तींमधल्या

फरकांची सरासरी, सेकंदासेकंदाचा हिशोब इत्यादींचा निर्देश टाळला आहे तो या गोष्टी अप्रस्तुत आहेत म्हणून नव्हे; तर शिक्षार्थीची गरज, समज, आकृतीसोबत राहणाऱ्या शाब्दिक विवेचनाची जोड यांचा हिशोब मनात ठेवून टाळला आहे. तुटक रेषेचा उपयोग करून एक महत्त्वाची सामान्य विभागणी स्पष्ट केली आहे.

चित्राकृती एक आणि दोन म्हणजे चित्रेच, पण आकृतीच्या कमीअधिक जवळ येणारी चित्रे. चित्राला नावांची जोड देण्याबद्दल तीन संकेत आहेत : सबंध चित्राला नाव किंवा खुलासा देणारी टीप देणे, चित्रातील विविध दृश्यरूपांवर किंवा त्यांच्याजवळ भौगोलिक नकाशात देतो तशी नावे देणे, आणि रेषेच्या मदतीने निरनिराळ्या भागांकडे अवधान ओढून घेणे. पोकळी शेडिंगने दाखवणे आणि छेद (क्रॉस-सेक्शन) घेऊन तो दाखवणे हे असेच दोन संकेत चित्राकृती एक मध्ये वापरले आहेत. हे विविध संकेत प्रेक्षकांच्या लक्षात येणे महत्त्वाचे आहे. नाही तर त्याला काही आकलन होण्याऐवजी त्याच्या मनात गोंधळच होण्याचा धोका आहे. असे आकलन होण्यासाठी दृष्टिसाक्षरतेची मदत होते.

चित्राकृती दोन मध्ये द्विमिती चित्रावरून त्रिमिती वस्तूचा बोध व्हावा, निरनिराळ्या अवयवांचे 'भौगोलिक' स्थान स्पष्ट व्हावे, छेद घेण्यापूर्वीची आणि त्याच्यानंतरची वस्तू यांची तुलना कळावी असा प्रयत्न केला आहे. परिणामी चित्राकृती अधिक मूर्त झाली आहे. त्यासाठी जिथे एकच अवयव आहे तिथे कट-अवे दाखवणे आणि जोडीचे दोन अवयव आहेत तिथे एकालाच छेद घेणे या क्लृप्ती वापरल्या आहेत. (त्रिमितीचा भास व्हावा यासाठी हल्ली पॉप-अप कट-आऊट पद्धतीची पुस्तकेही निघाली आहेत. इंद्रियरचना समजावून देण्यासाठी त्यांचा प्रतिरूपांच्या ऐवजी उपयोग होऊ शकेल.) या ठिकाणी कृष्णधवल आणि रंगित चित्र यांची तुलनाही विचारात घेऊ. (रंगित चित्र खर्चिक हा व्यावहारिक विचार आपण सध्या बाजूल ठेवलाच आहे.) शिक्षणाचा आशय अवगत व्हायला रंग खरोखर प्रस्तुत आहे का? तो प्रस्तुत नसला तर रंगामुळे चित्र नको तितके आकर्षक होऊन अवधानभंग होण्याचा धोका पत्करायचा का? या प्रश्नांची उत्तरे निर्णय घेण्यापूर्वी शोधायला हवीत.

चित्र एक मध्ये कालमितीची जोड देण्यचा एक निराळा प्रयत्न केला आहे. (आकृती दोन् मधला प्रयत्न गणिती वळणाचा होता.) या बाबतीत दोन शक्यता आहेत. पहिली शक्यता म्हणजे आपण भूमीकडे अवधान देतो आणि विशिष्ट वस्तूची आकृती त्या भूमीमध्ये स्थलांतर करताना आपण पाहतो. (उदाहरणार्थ चल चित्रपटाच्या पड्याच्या एक अंगाकडून दुसऱ्या अंगाकडे सावलीची आकृती सरकत जाणे.) दुसरी शक्यता म्हणजे आपण वस्तूकडे अवधान देतो आणि तिच्या

सभोवतालची भूमी कशी बदलते किंवा तिच्या पोटात काय हालचाली आणि घडोमोडी होतात हे पाहतो. (उदाहरणार्थ चल चित्रपटाच्या पडद्याच्या मध्यभागी उडत्या पक्षाची आकृती राहते आणि आपण हलते पंख आणि मागची सरकती झाडे पाहतो.) चल चित्रपटाची ही किमया या चित्रामध्ये स्थिर चित्र-पटाच्या मदतीने अंशतः आणि शैक्षणिक आकलनाच्या दृष्टीने कदाचित् पुरेशी साधली आहे. स्त्रीबीजवाहिनी ही भूमी चित्रात प्रत्यक्ष न दाखविता गृहीत धरली आहे. देवनागरी लिपीला सरावलेली आपली नजर आपसूक डावीकडून उजवीकडे सरकते आणि एकाच वेळी पुरुषबीज आणि स्त्रीबीज यांचे स्थलांतर टिपते आणि त्याचबरोबर अवस्थांतरही टिपते.

चित्र दोन मध्ये ना छेद आहे ना भूमी गृहीत धरण्याची क्लृप्ती आहे. प्रस्तुत वस्तू सरळ टेबलावर मांडलेल्या दाखवल्या आहेत. जणू त्यातून एक निवडून घ्या, असे आवाहन आहे. (चित्रात व्यंजना असते ती अशी. चित्राकृती दोन ही रंगीत असती तर बाह्य जननेंद्रिय रंगीत दाखवल्यामुळे अवधान विचलित झाले असते - तोही एक चित्रातील व्यंजनेचा प्रकार, पण नको असलेला.) शिक्षार्थीची समज मर्यादित असली तर अप्रस्तुत अशी भूमी दाखवणेही कधी श्रेयस्कर असते. (उदाहरणार्थ लहान मुलांसाठी तयार केलेल्या एका पाश्चात्त्य शैक्षणिक पुस्तिकेत मुलगा-मुलगी यांच्या शरीरातील अवस्थांतरे दाखवताना चित्रातील मुले शॉवरखाली आंघोळ करताना उभी आहेत असे दाखवले आहे. भूमीदाखल केवळ सांकेतिक क्षितिजरेषेवर भागवलेले नाही.)

या धावत्या परीक्षणामुळे दृष्टिगम्य शैक्षणिक माध्यमाचे कलातंत्र लक्षात यायला मदत व्हावी. मुख्यतः जी निवड करायची आहे ती सापेक्षतः अधिक मूर्तन आणि सापेक्षतः अधिक अपोद्धार यांच्यामधून. सापेक्षतः असे म्हणण्याचे कारण दृष्टिगम्य बोधात निखळ मूर्तन कधीच नसते (जसे ते वर्तनाच्या माध्यमातून होणाऱ्या शिक्षणात असते) आणि निखळ अपोद्धारही कधीच नसतो (जसा तो गणितगम्य बोधात किंवा गणिती वळणाच्या शब्दगम्य बोधात असतो). सामान्यतः आकृती अपोद्धाराकडे झुकते, चित्र मूर्तनाकडे झुकते, चित्राकृती यामधली असते - हे आपण अगोदर पाहिलेच आहे. आता काही निष्कर्षवजा नोंदी करायच्या -

(१) मूर्तन जास्त असले तर फायदा असा की वास्तवाचा आभास असल्यामुळे प्रेक्षकाचे अविचल अवधान मिळण्याचा संभव वाढतो, तसेच पूर्वसंकेतांवर भिस्त कमी असल्यामुळे अबोध प्रेक्षकांपर्यंत पोचण्याचा संभव वाढतो. याच बरोबर एक तोटा व्हायची शक्यता दिसते तो म्हणजे अप्रस्तुत गोष्टींकडे अवधान खिळण्याची शक्यता. (अधिक मूर्त चित्र उद्‌बोधक न ठरता नको तितके

आकर्षक ठरण्याचा हा धोका आहे.) तथ्य आणि नैपुण्य शिक्षार्थीपर्यंत पोचवायला मूर्तन अधिक उपयुक्त असते.

(२) अपोद्धार जास्त असला तर फायदा असा की अप्रस्तुताची गर्दी टाळल्यामुळे प्रस्तुताकडे अवधान स्थिर होण्याचा संभव वाढतो, शब्दगम्य बोधाची मदत घेऊन अमूर्त वस्तुस्थितीची समूर्त मांडणी करता येते. याच बरोबर एक तोटा व्हायची शक्यता दिसते, ती म्हणजे शैक्षणिक आशय आपल्या जीवनाला निकट स्पर्श करणारा कसा आहे याचे भान प्रेक्षकांच्या ठिकाणी उत्पन्न न होणे. (चित्रातल्या मुलग्याच्या किंवा मुलीच्या शरीरातली अवस्थांतरे ही आपल्याच शरीरातील अवस्थांतरे आहेत ह्याची जाणीव शिक्षार्थीला होणे जरूर आहे.) मर्मदृष्टी शिक्षार्थीपर्यंत पोचवायला अपोद्धार अधिक उपयुक्त असतो.

(३) चित्रशैली वास्तवदर्शी, समृद्धीचा संस्कार करणारी, भरड पोताची, खुल्या व्यंजनेची असली तर ती मूर्तनाला अनुकूल ठरेल. उलट ती संकेतसिद्ध, ऑस्टीयर, नितळ पोताची, बंदिस्त नेमक्या लक्षणेची असली तर ती अपोद्धाराला अनुकूल ठरेल. अभिवृत्ती रुजवणे किंवा तिला इष्ट वळण देणे हे काम मुख्यतः शाब्दिक माध्यमातून करायचे असते. पण चित्रशैली काही मर्यादेपर्यंत यात वाटा उचलू शकेल. (उदाहरणार्थ हास्यचित्रांमधून हलकेफुलके वळण देणे.)

तर असा हा दृष्टिगम्य माध्यमाचा **शैक्षणिक सारासारविवेक.**

**७ धनंजय, ७५९। ८३ भांडारकर रस्ता गल्ली, पुणे ४११००४**






आकृती एक : लोकसंख्यावाढीचे घातचक्र




आकृती दोन : रतिक्रिया आणि रतिभाव



चित्राकृती एक : स्त्रीची आतली जननेंद्रिये



चित्राकृती दोन : स्त्रीची जननेंद्रिये



चित्र एक : फलित स्त्रीबीजाचा स्त्रीबीजवाहिनीतून प्रवास



चित्र दोन : वेगवेगळ्या आकाराचे व आकारमानाचे डायफ्रॅम

# वर्ष १०, १९९२ सूची

## लेखक सूची







अनुक्रमणिका

**पैसे भरण्याबद्दल सूचना**

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास, कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठवली जाईल.

**पत्रिकेची वर्गणी**

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील, हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद-वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.
चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ६० रु.
सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो , की मागील वर्षांपैकी असो) १५ रु.
परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.
परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.
सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

**परिषदेची वर्गणी**

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिली आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला, तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि अंक एक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु.+२० रु. असे एकूण ६० रुपये भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तीसाठी १०० डॉलर)
[illegible]तकासाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तीसाठी २५० डॉलर) किंवा जास्त;
[illegible]श्रयदात्यासाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तीसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त.
(आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.
परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

**जाहिरातीसाठी दर**

पूर्ण पान ७५० रु. अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन/तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत चालेल, मराठीत असल्यास उत्तम.